# संगीत द्रौपदी.






हें नाटक

## रा० रा० कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर

'संगीत मानापमान,' 'संगीत विद्याहरण,' 'संगीत स्वयंवर,'
'सत्त्वपरीक्षा,' 'प्रेमध्वज,' 'भाऊबंदकी,' 'बायकांचें बंड,'
'कीचकवध,' 'सवाई माधवराव यांचा मृत्यु,'
'कांचनगडची मोहना,' इत्यादि
नाटकांचे कर्ते, यांनीं
लिहिलें.

मुद्रक व प्रकाशक-
शंकर नरहर जोशी,
'चित्रशाळा' प्रेस, १०२६ सदाशिव पेठ, पुणें शहर.

(आवृत्ति पहिली.)

सन १९२०

किंमत बारा आणे.

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.

'मयसभे'तील दुर्योधनाच्या मत्सरापासून प्रारंभ करून वनवासाला पांडव व द्रौपदी जाईपर्यंतचा महाभारताचा कथाभाग ह्या नाटकांत घेतला आहे. नाटकांतील पदांच्या चाली **प्रिन्सिपाल भास्करबुवा बखले** यांजकडून मुख्यत: घेतल्या असून **'गंधर्व नाटक मंडळीं'**तील रा. **बालगंधर्व** आदिकरून गायनपटु नटांनींहि ह्या कामीं चांगली मदत केली आहे. ह्याबद्दल **'गंधर्व नाटक मंडळी'** व **प्रि० भास्करबुवा बखले** यांचा मी फार आभारी आहें. पुस्तकांतील चित्रें **'गंधर्व नाटक मंडळीं'**तील नटांच्या त्या त्या प्रसंगांच्या फोटोंवरून तयार केलेलीं आहेत. सदर फोटो दिल्याबद्दल.व फार परिश्रम घेऊन नाटक बसविल्याबद्दल **'गंधर्व नाटक मंडळीं'**चे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

मुंबई, तारीख १ डिसेंबर १९२०.

ग्रंथकर्ता.



॥ श्री ॥

# संगीत द्रौपदी.

## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

[ सूत्रधार व पारिपार्श्वक पूजापात्रें घेऊन उभे आहेत. ]

नांदी.

पद १. [ राग—यमन; ताल—त्रिवट. चाल—'मुफलीत' ]

सुखवीत सकल, नटवीत चलाचल,
कमलापदयुग वंदिलें विमल ॥ ध्रु० ॥
अनादि लक्ष्मी, अनंत विपुला,
अवीट बाला, नसेचि चपला;
भ्रमतो विटतो मानव चंचल ॥ १ ॥

सूत्र०:—महालक्ष्मीचें पूजन आज इतकें चांगलें झालें आहे कीं, मन समृद्धींत गढून जाऊन कोणच्याहि गोष्टीची ददात वाटेनाशी झाली आहे! जा, हीं पूजापात्रें आंत नेऊन ठेवा, आणि आनंदांत आजचा दिवस घालवा. महालक्ष्मीची कृपा तुम्हा सर्वांवर झाली आहे. जा. मौज करा.

[ एक पारिपार्श्वक जातो.

पारि०:—म्हणजे आज नाटक करायचें नाहीं काय?

सूत्र०:—जिच्या प्रीतीकरितां नाटक करायचें, तीच जर आज माझ्या पूजनानें प्रसन्न होऊन येथें मूर्तिमंत अवतरली;—ही पहा प्रत्यक्ष महालक्ष्मी!

पद २. [ राग—छायानट; ताल—त्रिवट. चाल—'अचल गिरीवर' ]

सकल धनांतुनि विवडुनि रत्ना, रचनेत नव
गुंफुनिया मग देहा धरि ही अवतरतांना ॥ध्रु०॥
पाहुन ऐशी रत्नखनि नवा, जरि न शिवे
कधिं मत्सर जीवा, फिरावित नच मन बुद्धि,
तसा नर मुक्तचि माना ॥ १ ॥

जा, पूजापात्रें ठेवून या; आणि मग ह्या देवीच्या पायांवर मस्तक ठेवा.

[ पारि० जातो. नटी येते.

नटीः—

पद ३. [ राग—तिलंग; ताल—पंजाबी. चाल—' बसाकि नार ' ]

चटकचांदणी जणु नटुनि थटुनि येत मी
रुचिर शृंगार करुनि ॥ ध्रु० ॥ हेमवपु खरें,
मणिमय सारें; चमकतां हरे कनककोंदणीं ॥ १ ॥

सूत्र०ः—वैकुंठ सोडून माझ्या गरिबाच्या घरीं!—आजकाल भूतलावर देवता संचार करितात; पण वैकुंठाहून, कैलासाहून किंवा ब्रह्मसभेहून अधिक सुंदर म्हणून नांवाजलेल्या पांडवांच्या मयसभेंत थोडा वेळ तरी वास करायला मिळावा म्हणून त्या देवता भूतलावर येतात. मयसभा सोडून महालक्ष्मी वैकुंठालाहि परत जात नाहीं आणि जाणारहि नाहीं, असा बोभाटा झाला असतांना माझ्या घरीं महालक्ष्मीनें यावें—मयसभेवर महालक्ष्मी रुष्ट झाली आहे कीं काय? इथें येऊन असें गोड गाऊन महालक्ष्मीनें—

नटीः—म्हणजे घरचींहि माणसें ओळखायला येईनाशीं झालीं वाटतें !

सूत्र०ः—अग हो ! तूं का ही?—पाहूं नीट?—ओळखली; पण हे दागिने कोठून आणिलेस? ओझींच्या आझीं दागिने हे ! मी नुसता दागिन्यांकडे इतका वेळ पाहत होतों; चेहऱ्याकडे पाहतच नव्हतों.—कोठून हे दागिने आणिलेस? जुगारांत तर ही लूट तुझ्या हातीं नाहीं ना लागली? जुगारांतलें धन थोडा वेळहि टिकत नसतें, म्हणून विचारतों कोणच्या जुगारांत हें धन जिंकलेंस?

**नटीः**—मी आपल्याशिवाय कोणाशीं तरी जुगार खेळलें आहे काय ?

**सूत्र०ः**—फांशाचें दान तुला नेहमीं हुकमतशीर पडतें; ह्या अहंकारानें आणि लक्ष्मीच्या लोभानें राजसूय यज्ञाच्या समाप्तीच्या हल्लींच्या जुगारांत तूं देहभान विसरली असलीस तर त्यांत नवल नाहीं.

**नटीः**—जुगारांत हे दागिने मला मिळालेलेच नाहींत.—दैव नेहमीं माझ्या बाजूचें असतें, आणि आपण दुर्दैवी आहांत—

**सूत्र०ः**—मी दुर्दैवी ? अशी महालक्ष्मी ज्याची बायको आहे, तो दुर्दैवी ?—बरें पुढें ?

**नटीः**—आपण दुर्दैवी असल्यामुळें सहदेवमहाराजांची आज्ञा मी आपल्याला कळविली नाहीं—

**सूत्र०ः**—कोणची आज्ञा ?

**नटीः**—युधिष्ठिरमहाराजांच्या राजसूय यज्ञाकरितां जमलेल्या नट-नर्तकांना बिदागीकरितां त्यांनीं आजच बोलावलें होतें, तें मीं आपणांला कळविलेंच नाहीं. म्हटलें बरोबर अपशकून नको, एकटीच गेलें; आणि म्हणून हे इतके दागिने बिदागीदाखल मिळाले !—आहें का नाहीं मी दैववान ?

**सूत्र०ः**—मी महालक्ष्मीचें पूजन केलें म्हणून तुला दागिने मिळाले. देवतांच्या प्रसन्नतेसाठीं जेव्हां देह झिजवावा, तेव्हां वैभव प्राप्त होत असतें; समजलीस. मी तपस्वी, म्हणून तूं दैववान; दुसरें काय ? तपस्व्यांच्या मागें लागून महालक्ष्मी ही अशी येत असते.

**नटीः**—अडलें आहे खेटर महालक्ष्मीचें तुमच्यासारख्या दुर्दैव्याच्या मागें लागून यायला ! मी अशी जातें, आणि माझ्या पेटींत हे दागिने काढून ठेवितें.

**सूत्र०ः**—तसेंच कर. तेंच ह्या वेळीं चांगलें. दागिन्यांनीं तुला अशी फुललेली पाहून नटवर्ग माझा द्वेष करील. मयसभा पाहून कौरवेश्वर जसा मत्सरानें पेटला आहे, तसे मत्सरग्रस्त माझे हस्तक होऊं नयेत, म्हणून हे दागिने तूं उतरून ठेविलेच पाहिजेस.

पद ४. [ राग—भूप; ताल—एका. चाल—‘ प्रखर अनल ’ ]

मयविरचित दिव्यसभा, अवनिवरी नव शोभा,
पाहुनिया कौरवेश चोरासम धरि लोभा ॥ ध्रु० ॥
पांचाली घेरियली; कुटिल शकुनि, कर्ण बली,
नागविता दुःशासन, ठांइ ठांइ अधम उभा ॥ १ ॥

[ जातात.

[ मयसभेंतील द्रौपदीस्वयंवराच्या चित्राचा महाल; दुर्योधन व शकुनी महाल पहात आहेत, असा देखावा. ]

दुर्यो०:—मला हें पांडवांचें वैभव पाहवत नाहीं; आणि त्यांतल्या-त्यांत हें द्रौपदीस्वयंवराचें चित्र पाहिलें म्हणजे पूर्वींच्या सर्व गोष्टी डोळ्यांपुढें उभ्या राहतात व सर्वांगाची लाही होऊन जाते! मामा, मी मयसभेंत नसून, ही सभा म्हणजे मला जिवंतपणीं उभा जाळण्याकरितां रचलेली चिता आहे, असें मला वाटतें.—मामा, मी आपणाशीं बोलतों आहें खरा, पण जिव्हा आंतून जळते आहे; मी पहिलवानासारखा उभा टाकलों आहें खरा, पण हातपाय पेटले आहेत; माझे डोळे माझ्या प्राणांवर निखारे ठेवीत आहेत; माझे कान माझ्या प्राणांवर निखारे ठेवीत आहेत; माझीं सर्व इंद्रियें, माझें मन, माझी बुद्धि, माझ्या प्राणांवर निखारे ठेवीत आहेत! मामा, या रखरखलेल्या चितेंतून मी जिवंत बाहेर पडेन काय?

पद ५. [ राग—पूर्वी; ताल—त्रिवट. चाल—‘ कगवा बोले ’ ]

तनुला जाळी, आग भडकली; रिपु ठरला, जगांत
पहिला; सुखांत सुरमम अरि मम लोळी ॥ ध्रु० ॥
‘ कुरुबल दुर्बल ’ बोलत अबला; कौरव आला,
दुसरा ठरला; खरेंचि मरणाचि रचिली होळी ॥ १ ॥

शकु०:—सुयोधना, तुझ्याप्रमाणेंच मीहि इतक्या दिवस जळत होतों; पण आज मनाला जरा बरें वाटलें. इंद्रप्रस्थांत पाय ठेवल्यापासून मी जळत होतों, पण आज—

दुर्यो०:— आज कोणीं आपणाला शांत केलें?

**शकु०:**——सुयोधना, तूं पेटतो आहेस असें पाहून मी शांत झालों. तरुण तापले म्हणजे वृद्ध शांत होत असतात. मला वाटे मी क्रोधानें लाल होऊन काय करूं? पांडवांचें वैभव पाहून जो तूं चेवायला पाहिजे होतास, तो तूं शांत आहेस, आणि राजसूय यज्ञांत मुकाट्यानें पांडवांच्या खजिनदारांचें काम करीत आहेस, असें पाहून मी लाजेनें खालीं मान इतक्या दिवस घातली; आणि माझ्या बहिणीनें—गांधारीनें—निःसत्त्व मुलाला जन्म दिल्याबद्दल मी माझ्या घराण्याचा धिक्कारहि कित्येक वेळां केला; पण आज पुन्हा जिवांत जीव आला! सुयोधना, तूं हा राजसूय यज्ञ करायला पाहिजे होता; सम्राटपदाचा अभिषेक तुझ्या मस्तकावर व्हायला पाहिजे होता; राजा, तुझ्या राजधानींत असली मयसभा पाहिजे होती; आणि पांडवांच्या दुर्बलतेचीं आणि अवहेलनेचीं चित्रें तुझ्या महालांत सर्वांच्या दृष्टीला पडायला पाहिजे होतीं. राजा, तुझी योग्यता अशी असतांना, पाहुणा म्हणून दोन चार दिवस ह्या मयसभेंत रहावयाला तयार व्हावेंस? मत्स्यभेदाच्या वेळचा तुझ्या ह्या फजितीचा देखावा डोळ्यांनीं पहाण्यांत आनंद मानावास? कुरूंच्या कुळांत शिळपट दास जन्माला येऊन, माझ्या बहिणीचा गर्भाशय त्यानें नाहक विटाळला——

**दुर्यो०:**——नका, मामा, असें बोलूं नका. माझ्या अंगाला लागलेल्या आगीला असल्या वाऱ्यानें अधिक पेटवूं नका. मला ही आग सोसेनाशी झाली आहे. मयसभेंतलें सर्वांत सुंदर म्हणून नांवाजलेलें हें द्रौपदीस्वयंवराचें चित्र मी रोज पाहत असतों, आणि प्रत्येक वेळेला हें चित्र मला जळत्या निखाऱ्याप्रमाणें जाळीत सुटतें. मामा, मत्स्यभेदाकरितां बाण सोडीत असलेला हा अर्जुन, गदा सांवरून माझ्याकडे तिरस्कारानें पाहणारा हा भीम, आणि हातांत माळ घेऊन आनंदानें पुढें आलेली ही द्रौपदी, मामा, अर्जुन मत्स्याचे डोळे फोडीत नसून माझेच डोळे फोडतो आहेसें मला वाटतें! नाहीं मला हें चित्र पहावत नाहीं.

[ डोळे हातांनीं झांकून उभा राहतो. भानुमती व द्रौपदी येतात.

**भानु०:**——काय झालें, डोळ्यांना काय झालें?

**दुर्यो०:**——काय झालें?——हें चित्र पहा.

भानु०---ह्या--ह्या--द्रौपदीमहाराणीसाहेब.

दुर्यो०:---मला हें चित्र पहावत नाहीं; हेंहि नाहीं; आणि तेंहि नाहीं.---बाबांप्रमाणें मी अंधळा झालों असतों, तरी बरें झालें असतें.

द्रौ०:---खरोखरीच बरें झालें असतें. खुशाल ठेवा डोळे मिटून. आम्हां पांडवांचें वैभव कांहीं आपल्या डोळे मिटण्यानें काळेंकुट्ट होणारें नाहीं. आंधळ्याचेच चिरंजीव, आणि डोळसपणाचा कोण दिमाख पहा!---माझ्या स्वयंवराचे वेळीं कढईत पहात असतांना आपल्याला मत्स्य दिसला नाहीं, म्हणून जसे आपण फजीत होऊन, डोळे मिटून, खालीं मान घालून उभे राहिलांत, तसेच डोळे मिटून,---तें पहा त्या चित्रांत---तसेच डोळे मिटून, मला पाहतांच आजहि या मयसभेंत खालीं मान घातली पाहिजे. महाराजांचें वैभव पहाण्याची ताकद अंधपुत्रांच्या अंगीं कोठून असणार?---मी आलें म्हणून डोळे मिटून धरितां नव्हे काय?---भानुमतीबाईसाहेब, तुम्हीं नाहीं अजून सासूबाईचें अनुकरण करून डोळ्यांवर हात ठेवलेत ते?

दुर्यो०:---मी अंधळाच नव्हे तर बहिराहि झालों असतों, तरी बरें झालें असतें. मामा, मला पलिकडच्या महालांतल्या कारंज्याकडे न्या, आणि तेथें थंडपाण्याचें स्नान घाला; म्हणजे पेटलेला हा देह थोडा तरी शांत होईल.

द्रौ०:---पलिकडच्या महालांतलें कारंजें कशाला? ह्या सुंदर चित्राच्या अगदीं जवळ कोणालाहि जातां येऊं नये म्हणून ह्या संगमरवरी चबुतऱ्याचा पाण्याचा हौद केला आहे. ह्यांत उडी घेऊन खुशाल थंड व्हा!

दुर्यो०:---द्रौपदी, माझे बाबा अंधळे असले, तरी माझ्या डोळ्यांना चांगलें दिसतें हं! समुद्राच्या रंगाच्या संगमरवरी दगडांच्या चबुतऱ्यावर हें चित्र उभें केलें आहे, हा चबुतरा म्हणजे हौद नव्हे, हें मला दिसतें बरें का द्रौपदी!---मामा, चला आपण पलिकडच्या दालनांतल्या कारंज्याकडे ह्या दरवाज्यानें जाऊंया.

[ शकुनी आणि दुर्योधन जाऊं लागतात, तों तेथें दरवाज्याऐवजीं भिंतीला डोकें हापटतें. ]



दुर्यो०—मला हें चित्र पहावत नाहीं. [पृ. ६.]

द्रौप०:—अंधपुत्र ! डोळ्यांनीं चांगलें दिसतें ! अंधपुत्र ! भानुमती-बाईसाहेब, अंधळ्यांना हा दरवाजा दाखवा.

दुर्यो०:—अंधळा, मी अंधळा !

शकु०:—अंधळे, आम्ही अंधळे !

[ भानुमती शकुनी व दुर्योधन यांना दुसऱ्या दरवाज्यानें बाहेर घेऊन जाते. ]

द्रौप०:—जा, डोळस बायको वाट दाखवित आहे तिच्या मागून जा. असे लाजूं नका, असे शरमूं नका, जा बायकोमागून जा.—अंधळे ते अंधळे, आणि डोळसपणाचा कोण दिमाख पहा !—ज्यांच्या डोळ्यांना भिंत कोणती आणि दरवाजा कोणता, हें ह्या मयसभेंत नीट समजत नाहीं, त्यांनीं माझ्या स्वयंवराच्या वेळीं मत्स्यभेद करण्याला पुढें सरसावावें ! अशीच फजीती व्हावयाची !

पद ६. [ राग—हमीर; ताल—त्रिवट. चाल—‘ धीट लंगरवा ’ ]

**थाट समरिंचा दावी नट साचा; परि येतां**
**मग काळ करणिचा, लागतो नाट ॥ ध्रु० ॥**
**स्वयंवरा मम नटवा आला; सोंग सजविलें,**
**धनुला धरिलें; मत्स्य दिसेना, बाण चढ-**
**विना; जय पावेना हा थयथयाट ॥ १ ॥**

मी म्हणत होतें, ह्या दुष्टांना मयसभेंत राहूंच द्यायचें नाहीं म्हणून; पण ऐकणें झालें नाहीं. माझ्याकरितां ही मयसभा बांधली आहे; माझ्या हौसे-करितां हा दिग्विजय करण्यांत आला आहे; माझ्या मस्तकावर सार्व-भौमत्वाचा अभिषेक व्हावा म्हणून राजसूय यज्ञ केला; आणि अखेरीस पाहातें तों हा दुष्ट पाहुणा म्हणून ह्याच मयसभेंत !—आमची निंदा ऐकतां ऐकतां तीन चार दिवस कान किटले होते; आणि केव्हां कस्पटाप्रमाणें ह्याला झाडून टाकीन असें मला झालें होतें. आज बरी संधि मिळाली; आणि मेल्याचें डोकें त्या भिंतीवर हापटलेलें पाहून डोळ्यांचें पारणेंच फिटलें.—शाबास मयसभे ! तुझ्या सौंदर्यानें तूं तर मला मोहूनच टाकलें आहेस. दिसायला भिंत पण खरा दरवाजा, दिसायला दरवाजा पण खरी भिंत; पाणी दिसतें तिथें जमीन, आणि जमीन म्हणून चालत जावें तों

तिथें पाणी ! असल्या रंगविण्याच्या कसबानें तूं आज माझ्या शत्रूची फजीती पावलोपावलीं करीत आहेस. दिग्विजय करणाऱ्यांनीं मला सर्व स्त्रीजातींत श्रेष्ठ पदाला चढविलें खरें; पण रणांगणावर शत्रूला त्यांनीं पराभूत केल्यावर शत्रूची कशी फजीती होत असेल, हें प्रत्यक्ष पाहण्याचें सुख माझ्या डोळ्यांना, मयसभे, तूं आज दिलेंस. मयसभे, तूं आज मला धन्य केलेंस !

पद ७. [ राग—भूप; ताल—आध्धा. चाल—'झांझ मंदीरवा' ]

लाजविलें वैऱ्यांना, उरेना कामना ॥ ध्रु० ॥
सदा आनंद मळा, सुखाला संपूर्णाला सवित
आलें; न्यून भासलें, नाहीं देखिलें रिपुविडंबना ॥ १ ॥

प्रथम मला वाटलें, त्या दुष्टाची निर्भर्त्सना आपण कानांनीं कां म्हणून ऐकावी ? पण आतां वाटतें तो पुन्हां येथें यावा, आणि त्याची फजीती पुन्हां डोळ्यांनीं पहावी. [ दुर्योधन व शकुनी येतात.

**दुर्यो०**:—माझी फजीती पाहण्यांत हिच्या डोळ्यांना आनंद होतो आहे ! मामा, काय करूं आणि काय नको करूं असें मला झालें आहे. त्या कारंजाच्या जवळ गेलों, पाण्याचे तुषार उडत आहेत असें दिसतें खरें, पण सगळा भास ! पाणी नाहीं आणि कांहीं नाहीं ! तेथून पुन्हां येथें आलों तों हिचे हे शब्द !—मामा, माझ्यानें हेंहि चित्र पाहवत नाहीं, आणि हेंहि पाहवत नाहीं. स्त्रीजात आणि भावजय म्हणून हिची गय करतों; पण हिच्या ह्या अपराधाबद्दल पांचहि पांडवांना शिक्षा भोगावी लागेल. मामा, ह्या चित्रावर जरी मी गय केली, तरी ह्या चित्रावर गय करण्याचें कारण नाहीं. ह्या मयसभेंत जिथें जिथें पाणी दिसतें तिथें तिथें नुसता रंगविलेला फत्तर, आणि या असल्या प्रकारच्या कसबानें मयसभा माझी फजीती ह्या द्रौपदीच्या देखत करीत आहे. मयसभे, द्रौपदीची गय ह्या वेळीं मी केली, पण तुझी करणार नाहीं. माझ्या या फजीतीबद्दल तुझें नाक कापणेंच योग्य आहे. मयसभेंतलें हें सर्वांत सुंदर चित्र ह्या माझ्या गदेच्या एकाच टोल्यानें चूर्ण करून टाकतों; म्हणजे द्रौपदीच्या देखत मयसभेचें नाक कापल्यासारखें होईल.

राग—मियाचा मल्हार; ताल—एका. चाल—'आई समवन' ]

चित्रा भंगुनि ही गदा मोदें कौरवजन हांस-
विल गद्गदा ॥ ध्रु० ॥ छिन्न भिन्न मग माति
मयकृति, पांडव धाडिल रौरवाप्रति; होइल
स्वर्गी पंडुची निंदा ॥ १ ॥

—शाबास, सुयोधना, शाबास !

[ गदा उगारून चित्रावर धांवत जातो. शकुनी मागोमाग जातो.
दोघेहि चबुतऱ्याच्या पाण्याच्या हौदांत पडतात.
भीम गदा घेऊन येतो. ]

—मयसभेचें नाक कोण कापणार ? कोठें आहे तो दुष्ट ? गजे लाक्षागृह नव्हें. मयसभा आमची आहे; आणि मयसभेला करणारा ह्या गदेच्या तडाख्यानें मेलाच पाहिजे. द्रौपदी, कोठें ष्ट ?

—इतकें कांहीं रागवायला नको हो ! धनुर्धरांत श्रेष्ठ अर्जुन- आणि गदाधरांचे अग्रणी हे मल्लश्रेष्ठ इंद्रप्रस्थांत असतांना अप्रतिष्ठा कोण करणार ? अंधळ्याशीं लढायला आपली गदा हेजे ? मयसभेनें आपल्या शत्रूची पुरी फजीती करून कसें इलें आहे तें पहा.—तें पहा पाण्यांत कोण पडलें आहे तें पहा. —कोण दुर्योधन ? कोण शकुनी ? ह्यांना कोणी ढकललें ह्या

—त्यांच्या दुर्दैवानें, दुसरें कोण ढकलणार ? हे अंधळे आपण जाऊन पडले.—महाराज, शत्रूचा नाश केल्यावर वैऱ्याच्या लेली आपली गदा, आरक्त होऊन आपल्या शेजारीं आनंदानें लेली, रणांगणावर नेहमीं दृष्टीस पडते; पण आज तसलें सुख मान, मला मिळाला आहे. आज मी नाहीं या गदेकडे सवती- शणार, तर ह्या गदेनेंच माझ्याकडे सवतीमत्सरानें पाहिलें

पद ९. [ राग–बिहाग; ताल–त्रिवट. चाल––'ना देरे तन तदेरे ना'
मुदित सवत नच या काला; हंसली गदा
न; कसली फुगली, बसली रुसली; नाहीं
निज रिपुगण तिज जलांत बुडतां दिसला ॥ध्रु०॥
समरीं बळधर वीरांचा कर हिज दावी अरि-
वरविनाश; हा खरा उपचार, शोभवी फार
अबला ॥ १ ॥

महाराज, मयसभेनें माझा कैवार घेऊन आपल्या शत्रूंना त्या तेथें बुडवि
आहे; आणि गदेला आतां आपण इतक्याजवळ करून सवतीमत्सरा
मला त्रास देण्याचेंहि कारण ठेवलें नाहीं.

**भीमः**––गदेला दूर करून, तुझा हात धरून, ह्या हंसऱ्या चंद्राल शत्रु पाण्यांत बुडत असतांना उसळणाऱ्या लाटांची मौज मी दाखवावी अशीच तुझी इच्छा आहे ना ?

**द्रौपदीः**—दुसरी कोणती इच्छा असणार ?

[ गदा खालीं ठेविते

**दुर्यो०ः**––आज हंसतां, उद्यां रडाल. द्रौपदी रडत असतांना अशी गदा दूर ठेवून, निर्बलाप्रमाणें तिच्या डोळ्यांतल्या अश्रूंकडे पहायला, भीम मी तुला उद्यां लावीन.

**भीमः**––आज तूं तर रड, उद्यां आम्हीं केव्हां रडूं तेव्हां रडूं ! माम आज भरपूर रडून घ्या.

**शकु०ः**—हें आमचें शेवटचेंच रडणें आहे; तेव्हां भरपूर रडून घे बरें. तुमचेंहि हंसणें शेवटचेंच आहे; तेव्हां तुम्हीहि भरपूर हंसून घ्या.

**भीमः**—ह्या हौदांत तुम्ही पुरते बुडाला नाहीं, म्हणून ह्या उद्यांच रडण्याच्या वल्गना आहेत वाटतें ! पांचाली, आम्हांला लाक्षागृहांत जा ण्याचा ह्यांचा बेत फसला; पण मयसभेनें ह्यांना पुरतें बुडविल्याशिव रहावें हें मला पसंत नाहीं. तुला दूर करून, गदा हातांत घेऊन, चांडाळांचा कपाळमोक्ष ह्या चित्रांपुढें ह्या पाण्यांत करावा, असें मला वाट [गदा हातांत घेतो.] बोल, दुष्टा, उद्यां कोणाला रडायला लावणार,



द्रौ०—निःशस्त्र शत्रूवर शस्त्र उगारणें हें पांडवांचें ब्रीद नव्हे. [पृ. ११.]

बोल. भीमाच्या हातात ही गदा अशी नाचत असतांना, द्रौपदीच्या डोळ्यांतून अश्रुधारा तूं कशा काढणार, तें सांग ? आज तुझ्या ह्या रडण्यांतच तुझ्या आयुष्याची समाप्ति करून टाकतों. [ गदा उगारून धांवतो. द्रौपदी गदा धरून अडविते.

द्रौप०:—निःशस्त्र शत्रूवर शस्त्र उगारणें, हें पांडवांचें ब्रीद नव्हे. महाराज, हा दुष्ट संकटांत असतांना ह्याच्यावर गदेचा प्रहार जर आपण केलात, तर आपल्या पराक्रमाला कलंक नाहीं का लागणार ? असला अधर्म धर्मराजांना कसा आवडेल ?

पद १०. [ गज्जल—जिल्हा खमाज. चाल—' मै फक्त एक नहिं' ]

**धर्ममय ही काया, धर्म हा विजया पाया;**
**बुडतां तो नासवितो शूर वीरांची विद्या ॥ध्रु०॥**
**पांडव हा, कुरु हा, तुल्यबली सकला; परि**
**घाली कमला लोटांगण धर्माला ॥ १ ॥**

**भीमः**—पांचाली, असले दुष्ट तुझ्या दयेला पात्र व्हावेत किंवा धर्मराजांच्या धर्मानें त्यांचें संरक्षण करावें, हें मला मुळींच आवडत नाहीं. माझी गदा मला असला अडथळा कधींच करीत नाहीं; म्हणून मी तिला नेहमीं जवळ बाळगतों. तुला आवडत नसलें, तरी ह्या गदेला आवडतें; म्हणून ह्याचें मस्तक मला ह्या वेळीं फोडूं दे.

द्रौपदीः—ह्यांना पाण्यांतून बाहेर येऊं दे आणि मग खुशाल ह्या मयसभेंत गदायुद्ध होऊं दे. माझी ना नाहीं.

**भीमः**—दुर्योधना, द्रौपदीची आणि ह्या मयसभेची निर्भर्त्सना करण्याचें सोडून देत असलास, तर तुला जिवंत सोडतों.

दुर्यो०:—अग्रपूजेच्या वेळीं ह्या मयसभेंत कृष्णानें शिशुपालाचा वध कपटानें केला त्या वेळींच तुम्हां पांडवांचा धिःकार मीं उघडपणानें करायला पाहिजे होता. पण कपटानें माझाहि वध तुम्ही कराल, म्हणून भ्यालों. त्या पातकाचें फळ आज मी भोगतों आहें. भीमा, मला आतां कपटी मृत्यूची भीति उरली नाहीं. कपटी कृष्ण, उन्मत्त पांडव, मायावी मयसभा आणि नटवी द्रौपदी ह्यांची निर्भर्त्सना मी नेहमीं करणार. मार,

खुशाल माझ्या मस्तकावर गदा मार, आणि कपटानें मला मारण्याची हौस पुरवून घे.

**शकु०:**—खुशाल आम्हाला मारून टाक. लाक्षागृह कपटानें निर्माण करून त्यांत पांडवांना जाळण्याचा कट कौरवांनीं केला, अशी आमची नालस्ती तुम्हीं पांडव करीत असता! मयसभेंत कपटानें, भीमा, तूं आम्हाला मारल्यावर जगालाच कळून येईल, कपटी कोण, कौरव का पांडव. उचल, भीमा, गदा उचल, आणि कपटाचा धनी हो.

**भी०:**—तुम्हाला असेंहि मारलें तरी पाप नाहीं; पण एव्हढी तरी तुमची ऐट कशाला? ये, दुर्योधना, पाण्यांतून बाहेर ये, आणि गदायुद्धाला तयार हो. ये, असा बाहेर ये बाहेर; आतां पाय मागें कां? पाण्यांतून बाहेर पाय कां निघत नाहीं?

**शकु०:**—ह्या हौदांत पाण्याच्या तळाशीं पाय पकडणारीं यंत्रें ठेवून, त्यांत आम्हाला अडकवून, पुन्हां बाहेर ये म्हणतां? कृष्णाहूनहि तुमची कपट-नीति अधिक निलाजरेपणाची आहे!

**दुर्यो०:**—माझे पाय पाण्यांतल्या यंत्रांत सांपडले आहेत; नाहीं तर—

**द्रौपदीः**—मयासुराला बोलावून मी तुमच्या पायांतला खोडा दूर करवूं का?

**दुर्यो०:**—मी शत्रूपाशीं आजपर्यंत दीनपणानें कांहींहि मागितलें नाहीं. शत्रूच्या पुढें दैन्याचें शब्द हा कौरव ह्यापुढें कधींहि उच्चारणार नाहीं. भीमा, माझ्या मस्तकावर खुशाल गदेचा प्रहर कर; माझ्या मस्तकावर आपटून तुझ्या गदेचे दोन तुकडे झाल्याशिवाय राहणार नाहींत. माझ्या मातेच्या कृपादृष्टीनें मी वज्रदेही झालों आहें. खडकावर पाण्याची लाट जशी आपटावी आणि शतशः तुकडे होऊन परत जावी, तशी तुझी गदा तुकडे तुकडे होऊन मागें परतल्यावांचून राहाणार नाहीं.

**भीमः**—(दुर्योधनाचें डोकें धरून) आहे, वज्राचा खडक आहे! गदा फुटेल खरी! लहानपणीं यमुनेंत पोहायला आम्ही सर्व शिकत होतों, त्या

वेळीं दुर्योधना, तुला पाण्यांत बुडवून गटंकळ्या जशा मी चारीत असें— पांचाली, बुडवूं का ह्याला पाण्यांत ?

द्रौप०:—हें काय हें ! शत्रूला झालें तरी इतकें हिणवूं नये गडे !

पद ११.[ राग–जिल्हा खमाज; ताल–झपताल–चाल—'आज आनंद मुखचन्द्र' ]

हा हिणवाल जरि फार, ना दिसे संसार-
पार ॥ ध्रु० ॥ लांबला आनंद, सुखविता
दमला; आधार गेला, सुखा मुकला ॥ १ ॥

मी अशी जातें आणि धर्मराजांना इकडे पाठवून देतें. [ जाऊं लागते.

भीमः—हें पहा द्रौपदी, अर्जुन आणि नकुल-सहदेव यांना प्रथम येथें येऊं दे; आणि मग धर्मराजांना कळीव. लाक्षागृहांत त्यांनीं भोगलेल्या दुःखांचे पांग, ह्यांना असें पाहिलें म्हणजे फिटणारे आहेत. अर्जुनानें हें सुख उपभोगण्याच्या अगोदर, धर्मराज येथें येतां कामा नये; समजलीस द्रौपदी. ( द्रौपदी जाते. ) आतां तुम्ही मोठमोठ्यांदा रडारे. धर्मराजा येईतों मी खदखदा हंसून घेतों. ह्या भीमाला तुम्ही जंगली समजतां नव्हे रे ! मी हिडिंबेशीं लग्न केलें, म्हणून मला रानटी मानतां नव्हे ! माझ्या अंगांतला रानटीपणा सर्व ह्या वेळीं उचंबळून येऊं दे; आणि मला पोटभर हंसूं दे. दुर्योधना, तुला खरोखर सांगूं, तुला असा पाण्यांत आपण होऊन खोड्यांत अडकून पडलेला पाहून मला जितका आनंद होतो आहे, तितका आनंद, जरासंधाला मल्लयुद्धांत ठार मारल्यावरहि झाला नाहीं. मयसभेंतल्या ह्या सुंदर चित्रांकडे पहात घटकानुघटका उभे राहून आनंदानें तल्लीन झालेल्यांना कोणची खुमारी दृष्टीस पडते, हें मला आजपर्यंत समजलेलें नाहीं. किंवा मयसभा सर्वांत सुंदर कां म्हणून म्हणतात,हेंहि मला अजून समजलेलें नाहीं.

शकु०:— गांवढळ ! कोठून समजणार !

दुर्यो०:— असले बैलोबा मयसभेचे मालक व्हावेत हं !

भीमः—पण आज मात्र मयसभा मला खरी सुंदर दिसते आहे. त्या चित्रामुळें नव्हे; हें–हें– पाण्यांतलें चित्र— [ भानुमती येते.

**भानु०:**—ते कोठें आहेत ? सांगा भावोजी, कोठें आहेत ते ? त्यांची ही गदा अशी येथें कां पडली आहे ? भावोजी, तुम्हीं नाहीं सांगणार; पण ही गदा सांगेल, ते कोठें आहेत तें.

**पद १२.** [ राग--भिमपलास; ताल--झपताल. चाल,– 'भरन लगी' ]

**न रणभुमि न विलसन, एकावरी प्रेम**
**न धरि करुजन ॥ ध्रु० ॥ समप्रीति जरि**
**ख्याति, नातें भगिनीचें तुझें साचें; करि**
**मनन ॥ १ ॥**

गदे, त्यांनीं तुला टाकलें; पण मी नाहीं तुला सवतीमत्सरानें दूर करणार ! अग,आपण बहिणी बहिणी;ये अशी जवळ,आणि सांग मला ते कोठें आहेत ते.

[ पडलेली गदा उचलून घेऊं लागते.

**भीम:**—हं! गदेला हात लावावयाचा नाहीं—या गदेवर पहारा करण्याकरितां मी उभा आहें. कौरवेश्वर येथें येऊन, गदा हातांत घेऊन, माझ्या हातांतल्या ह्या उभ्या गदेची आणि ह्या लोळणाऱ्या गदेची गांठ पडेतों, गदेवर माझा पहारा आहे.

**भानु०:**—मग ते कोठें आहेत तें मला सांगा !

**भीम:**—मला विष घालून यमुनेच्या डोहांत बुडविल्याचें प्रायश्चित्त, ह्या हौदांत भोगीत आहेत.

**भानु०:**— ही काय स्थिति झाली ही ? असें पाण्यांत काय म्हणून राहावयाचें ! बाहेर नाहीं का यायचें ?

**भीम:**—पाय खोड्यांत अडकून पडल्यामुळें, हे आपोआप आमचे कैदी झाले आहेत. धर्मराज येऊन हे बंधमुक्त होईतों, मी कैद्यांवर पहारा करितों आहें.--कैद्यांवर पहारा—पहारा कैद्यांवर !

**भानु०:**—भावोजी, हें तुम्हां पांडवांना शोभतें का ? आम्हाला बोलावून आणून अशी आमची विडंबना ?

**पद १३.** [ राग--जयजयवंती; ताल--झपताल. चाल—' अचल रहो राज' ]

**नयनांति ही नाहीं; बंधूसि व्यसनीं देखोनि**



दुर्यो० –वैरिण, हडळ, चांडाळीण–　　[ पृ १९. ]

स्वस्थ मन राही ॥ ध्रु ॥ जो कौरवजनां,
तो पांडवांना न्याय पाही ॥ १ ॥

ह्यांचे हे हाल तुम्हाला पहावतात का भावोजी ?

भीमः—वहिनी खरें सांगूं, पांचाली ह्यांना नको नको म्हणत असतांना, हे आपण होऊन पाण्यांत पडले !

भानु०:— पण तुम्ही कां त्यांना वर काढीत नाहीं ?

भीमः—वहिनी, मला पाण्यांत कोणतीं यंत्रें ठेविलीं आहेत, तें माहित नाहीं. पण सुयोधनानें जर मला तसें सुचविलें, तर या गदेनें हा हौद फोडून, यंत्रें मोडून, सुयोधनाला बंधमुक्त करितों. माझी ना नाहीं. पण—हेच—हेच—

भानु०:— त्यांनीं नाहीं तर मी तसें सुचवितें !

दुर्यो०:— खबरदार भानुमती, माझ्या हालअपेष्टा वांचविण्याकरितां, माझ्या वैऱ्याचीं आर्जवें तूं जरादेखील करूं नकोस. त्यामुळें मला अधिक यातना होतात.

भीमः—ऐकलेंस वहिनी! आतां माझ्याकडे कोणता दोष आहे ? हा हौद फोडल्यानें मयसभेची शोभा नष्ट झाली, तरी हरकत नाहीं; पण आमच्या बंधूंना—कौरवांना—एक क्षणभरहि या मयसभेंत दुःख होतां कामा नये. वहिनी, सुयोधनमहाराज हट्टी आहेत; पण माझ्या सारख्या आडदांडाला तुझीहि आज्ञा पुरेशी आहे. फोडूं मी हा हौद ?

दुर्यो०:— तूं जर माझी अर्धांगी असलीस, तर माझ्या हृदयांतलें वैर ह्या वेळीं तुझ्याहि अंगांत संचारलें पाहिजे. भानुमती, माझ्यावर उपकार करायला भीमाला सांगून, तूं माझी वैरीण होऊं नकोस !

भानु०:—असें काय बोलायचें तें ? संतापून जाऊन उगीच आपलें हसें करून घ्यावयाचें, आणि नसतें वैर उत्पन्न करून, स्वतःला आणि आप्तइष्टांना दुःखांत लोटून द्यायचें ! पांडव आपले बंधु; वैरी का आहेत?

पद १४. [ राग--सारंग; ताल--त्रिवट; चाल—' येहो रंग भर दे' ]

टाळा निजपर हा चाळा, कुरुकुल—शुभफल
पांडववैभव; हेंचि ऐक्य मज सुखसोहाळा

॥ ध्रु० ॥ बंधु बंधु जरि वैरी झाला, करील
दैव तरि वक्राचि डोळा ॥ १ ॥

नाना प्रकारच्या विलासांत चार दिवस ह्या मयसभेंत आनंदानें घालवायचें सोडून, खांबावरच रागाव, त्या भिंतीवरच डोळे फाड, त्या कारंज्यावरच गदा उगार—नुसत्या कल्पनेनें दुःखाचे डोंगर उत्पन्न केलेत; आणि असें पाण्यांत अडकून पडलांत ! ही वैराची नुस्ती कल्पना आहे हो, अगदीं कल्पना आहे. मला कि नाहीं, इतक्या दिवस मनुष्याला भूत लागतें म्हणून म्हणतात, तें खोटें वाटत असे; पण बाई खोट्या वैराचें पिशाच्च—

**दुर्यो०:**—मला भूतबीत कांहीं लागलें नसून, तूं हडळ होऊन माझ्या मानगुटीवर बसूं पाहते आहेस खरी !

**भानु०:**—मला हडळ म्हणा कांहींहि म्हणा, आपणाला दुःखांतून सोड-विण्याचा मला आधिकारच आहे. भावोजी, मी तुमची विनंति करतें—मी करतें—

**दुर्यो०:**—वैरीण—हडळ—चांडाळीण—वैरीण—

**भानु०:**— मी विनंति करितें—

**दुर्यो०:**—दुःशासना, कर्णा,—येथें कोणी कौरवांचा अभिमानी नाहीं काय ? दुःशासना, कर्णा, कोणी तरी धांवा, धांवा; दुःशासना, कर्णा, धांवा, ही घरभेदी सटवी वैऱ्याची गदा ह्या कौरवेश्वराच्या मस्तकावर मारीत आहे. अरे धांवा, धांवा, कर्णा, दुःशासना— [ दुःशासन येतो.

**दुःशा०:**—दादा, हा दुःशासन जिवंत असतांना, आपणाला कोण दुःख देत आहे ?—आपण असे संकटांत कसे ? पाण्यांत आपणाला कोणीं लोटलें ?—या भीमानें काय?—अरेरे! मीं गदा बरोबर आणली नाहीं !

**दुर्यो०:**—ती माझी गदा तेथें पडली आहे, ती हातांत घे; आणि भीमाशी लढतांना अंगावर बाजू येते आहे, असें जर तुला वाटलें, तर प्रथम ती गदा ह्या भानुमतीच्या डोक्यावर मार, आणि मग भूमीवर मरून पड. वैऱ्याचा कैवार घेते वैरीण. [ दुःशासन गदा घेऊं लागतो. ]

**भीम:**—खबरदार गदेला हात लावशील तर!-गदा आणली नाहींस पण हात तर बरोबर आणले आहेस ना? मग थोपट दंड आणि होऊंद्यात दोन हात.



भीम—माझ्याबरोबर तूंहि गदायुद्ध करणार ?

[ पृ. १७. ]

( कुस्तींत भीम दुःशासनाला खालीं पाडतो. ) तुला रे कशाला गदा पाहिजे ? माझ्याबरोबर तूंहि गदायुद्ध करणार ? अरे तुला अशा अशा दोन थपडा— दोन थपडा— ( थपडा मारतो ) पुरे झालें कि नाहीं गदायुद्ध ? दोन थपडा सोसण्याचेंहि सामर्थ्य तुला नाहीं—

**दुःशा०:**—माझी विटंबना करतोस—भावजयीच्या देखत—दादाच्या देखत विटंबना करतोस ! थपडा मारतोस ?—गदा घेऊं दे—थपडा मारतोस—कर्णा, धांव, धांव आणि कौरवांची अब्रू सांभाळ; कर्णा, धांव, धांव,—थपडा मारतोस—कर्णा, धांव, धांव—आला बघ तो कर्ण; भक्तांच्या नवसाला देव जसा पावतो, तसा माझ्या हाकेसरशीं कर्ण धांवत आला बघ.—कौरवांची लाज कर्णा बरी राखलीस.—थपडा मारतोस—तो पहा आला धनुर्धर कर्ण—

**भीमः**—येऊं दे रे—धनुर्धर येऊं दे, नाहींतर अतिरथी, महारथी येऊं दे; पुरेत थपडा ? पुरे झालें गदायुद्ध ! आतां वडील भावाच्या शेजारीं पाण्यांत उभा रहा, आणि कर्णाचा धांवा कर.

[ उचलून पाण्यांत टाकतो.

**दुःशा०:** – माझी जशी आतां विटंबना केलीस, तशी सर्व पांडवांची करीन, आणि मग देवाचा धांवा करतां करतां पांडवांना पुरेवाट होईल;— कर्णा धांव, धांव कर्णा—

[ कर्ण येतो.

**कर्णः**—दुःशासनाची विटंबना कोण करतो ? सुयोधनाची हालअपेष्टा ! मग ह्या कर्णानें धनुष्य हातांत कशाला धरिलें ?

पद १५. [ राग–शंकरा; ताल–झंपा. चाल–' निर्धना जी वरी ' ]

परशुरामें मला उपदशिली कला. ठरे निर्बला
जरि दुःख यांना ॥ ध्रु० ॥ कुंडलें कवच मज
देतसे सूर्य निज, फुकट तीं समज जरि दुःख
यांना ॥ १ ॥ दाता न कर्ण सम; दुमदुमे
कीर्ति मम; फोल तें नाम जरि दुःख यांना ॥ २ ॥

बोलीव, भीमा, अर्जुनाला बोलीव, नाहींतर कृष्णाचा धांवा कर; हा

कर्णाचा बाण एका क्षणांत ह्या चबुतऱ्याचा फडशा करून माझ्या मित्रांना संकटांतून सोडवितो आहे.—ए बैलोबा, नीट पहा, धनुर्विद्येचा चमत्कार पहा.

**दुर्यो०:**—थांब, कर्णा, जरा थांब; पहिल्या बाणानें ह्या चित्रांतील अर्जुनाच्या हातांतलें धनुष्य तोड आणि मग आम्हांला दुसऱ्या बाणानें—

**दुःशा०:**—दुसऱ्या बाणानें ह्या चित्रांतल्या द्रौपदीचें नाक कापून तिला छिन्न भिन्न कर; आणि मग तिसऱ्या बाणानें आम्हांला सोडीव. भीमा, आमचा देव हांकेसरशीं धांवत आला आहे; भीमा, कौरवांचा देव तुझ्या द्रौपदीची कशी दुर्दशा करतो आहे तें पहा.

**कर्ण:**—दुःशासना, चित्रांतल्याहि बायकांवर हा कर्ण शरसंधान करीत नसतो.

**भानु०:**—वंगराज, ह्यांना संकटांतून सोडवा म्हणजे झालें; अधिक कांहीं नको.

**कर्ण:**—वहिनी, सुयोधनाचा प्रत्येक शब्द ह्या कर्णानें आजपर्यंत झेलला आहे; आणि पुढेंहि झेलीत राहील. कौरवेश्वराचा कोणताहि शब्द फोल होऊं नये म्हणून मी माझ्या प्राणांची किंमत द्यायला तयार आहे. कौरवेश्वरा, चित्रांतल्या अर्जुनाचें धनुष्य तोडण्याकरितां, हा माझा बाण धनुष्यावर चढला पहा. [ बाण चढवितो; दुसरा बाण लागून बाण खालीं पडतो; अर्जुन आणि द्रौपदी येतात.]

**द्रौप०:**—सारथिपुत्राचा बाण माझ्या स्वयंवराच्या चित्रालाहि स्पर्श करूं शकणार नाहीं.—निर्जीव चित्रावर बाण कां ?—खांडववनांत इंद्रप्रस्थाचें राज्य स्थापणारे हे वीर तुमच्या पुढें उभे आहेत; राजसूय यज्ञांत दिग्विजय करणारे हे महारथी तुमच्या पुढें उभे आहेत; मत्स्यभेद करून धनुर्विद्येंत अजिंक्यपत्र मिळविणारे धनुर्धर तुमच्या पुढें उभे आहेत; बाण मग चित्रावर कां ? धनुष्य तोडायची शक्ति नसतांना नुसत्या वल्गना कां ? चित्रांतलें धनुष्य कशाला ? ह्या दिग्विजयी धनुष्यावर ताकद असेल तर शरसंधान करा.—चित्रांतली द्रौपदी कशाला ? मी तुमच्या पुढें

जिवंत उभी आहें;महाराज्ञी म्हणून मिरवतें आहें;मयसभेची मालकीण म्हणून मयसभेची निर्भर्त्सना करणारांकडे हंसत पहात आहें! मग चित्रांतल्या द्रौपदीला छिन्न भिन्न करण्यांत पुरुषार्थ कोणता? नांवाचे वीर, नांवाचे धनुर्धर,नांवाचे पुरुष! सारथिपुत्र पुरुषार्थाच्या श्रेष्ठ पदवीला चढत नसतात. वंगराज, त्या चित्रांत जसे तुम्ही म्लान वदन होऊन खालीं पहात उभे आहांत, तसेच अधोवदन होऊन येथेंहि उभें राहिलें पाहिजे. मयसभेंतल्या महाराज्ञीच्या ह्या आवडत्या महालांत, महाराज्ञीपुढें जर तुमची नजर वर झाली तर सारथिपुत्रानें आपली मर्यादा सोडली असें समजून, मत्स्यभेद करणारे हे धनुर्धारी तुमच्या डोळ्यांतल्या बाहुल्या तत्क्षणीं फोडल्यावांचून राहणार नाहींत.

**कर्णः**—पांचाली, हा कर्ण सर्व स्त्रीजातीवर नेहमीं सदयतेचीच दृष्टि ठेवीत असतो. तुझ्यावर दया करून मी खालीं पाहतों आहें; तुझ्या स्वयंवराच्या वेळीं सारथिपुत्राशीं मी स्वयंवर करूं इच्छित नाहीं, असे तुझे शब्द ऐकून बलात्कारानें तुला बायको करूं नये असें ह्या सदय कर्णाला वाटलें, आणि म्हणूनच मी अधोवदन उभा राहिलों. पांचाली, तूं जरा बाजूला हो, आणि तुझ्या आड उभे असलेले ते भीमार्जुन माझ्या समोर येऊं देत, तुलाच प्रत्यक्ष दाखवितों; मीं केवळ दया केली म्हणून तूं माझी बायको तुझ्या स्वयंवराच्या वेळीं झाली नाहींस.

**भीमः**—वंगराज, तो बाण खालीं पडला आहे तो उचलून तर घ्या मग पुढें लढण्याच्या गोष्टी! पांचाली, अशी बाजूला उभी रहा. ते पहा धर्मराज, मयासुराला बरोबर घेऊन आले. आतां इतक्यांत कौरवेश्वर बंधमुक्त होतील, तोंपर्यंत हा देखावा डोळेभरून पाहून घेऊं या.

[ तिघेहि पहात हंसत उभे राहतात.

**दुर्यो०:**—कर्णा, कृष्ण जसा पांडवांचा देव आहे तसा तूं आम्हां कौरवांचा देव आहेस. अग्रपूजेच्या सभेंत क्षणांत शिशुपालाचें मस्तक उडवून जसा कृष्णानें पांडवांना संतोष दिला, त्याप्रमाणें क्षणांत एका बाणानें हा हौद फोडून दुसऱ्या बाणानें हंसणाऱ्या भीमार्जुनाचे दांत

पाहून आम्हां कौरवांना तूं हर्षभरीत कर.–धर्म येथें येऊन पोहोंचायच्या आधीं मी सांगितलें तसें कर; निदान आम्हाला पाहून हंसणाऱ्या ह्या शत्रूंचे दांत तरी क्षणांत पाड. [ कर्ण बाण उचलूं लागतो.

भानु०:—आतां येथें तंटाबखेडा नको. हे धर्मराज आलेच. सर्वांना ते सोवडतील. सुखरूप आपल्या शिबिरांत जाऊं, मग पुढचा विचार पुढें तेथें करूं.–धर्माच्या वेळीं वंगराज, अधर्म नको.

[ कर्ण उचललेला बाण खालीं टाकतो.

भीमः—अर्जुना, हा कौरवांचा देव कसा अवसानघातकी आहे पहा. पांचाली, आमचा श्रीकृष्ण असा अवसानघातकी नाहीं.

द्रौप०:—पाप्याला आयत्या वेळीं भ्रम व्हायचाच.

[ धर्म व मयासूर येतात.

धर्मः—कौरवेश्वराचें शांतवन करायचें सोडून, तुम्ही असे हंसत उभे कां ? असें हांसणें चांगलें नव्हे.–मयासुरा, कळ दाबून ह्या हौदांतलें पाणी काढून टाक; आणि तळाच्या यंत्रांतून कौरवेश्वरांना अगोदर सोडाव कसा. असे तुम्ही हंसू नका. स्वतःच्याच बंधूंना पाणी आणि जमीन नीट ओळखतां आली नाहीं म्हणून हंसायचें ?

पद १६. [राग--भीमपलास; ताल--त्रिवट. चाल–'पिया मिलन हम जाये']

चंद्रासमचि कुळ, आप्त प्रभावळ; नाहीं सर्व भाग
तेजोमंडळ ॥ ध्रु० ॥ चंद्र दिसत अति कलंकित ांति;
कलंक खुलवी पूर्ण काळ ॥ १ ॥

द्रौप०:—आम्हां आपण होऊन हंसत नसून, यांची कृति आम्हांला हंसायला लावीत आहे. [ दुर्योधन, शकुनी दुःशासन हौदांतून वर येतात.

दुर्यो०:—आमची कृति उद्यां रडायला लावील.

धर्मः—सुयोधना, कोरडीं वस्त्रें परिधान कर.

दुर्यो०:—माझा क्रोधाग्नि इतका भडकला आहे कीं, ओलें आणि कोरडें सर्वच जळतें आहे. धर्मराज, ह्या ठिकाणीं आपण माझी अग्रपूजा करून श्रीकृष्णाची केलेली पूजा वृथा होती, हें कबूल तरी केलें पाहिजे,

किंवा ह्या भीमानें माझ्याबरोबर गदायुद्ध केलें पाहिजे; आणि कर्णाशीं अर्जुनानें येथें लढलें पाहिजे.

**धर्मः**—बा सुयोधना, श्रीकृष्णाच्या अग्रपूजेचा वाद राजसूय यज्ञाच्या सभेंतच मिटला आहे. तो वाद पुन्हां उकरून काढून, कौरवपांडव बंधु-बंधु असतांना, पांचालीच्या विलासमंदिरांत ते लढले, असा आमच्या कुळाचा दुर्लौकिक कां करून घेतोस ?

**दुर्यो०:**—आपलें कूळ, कौरवपांडवांचें बंधुत्वाचें नातें! नातें गोतें त्या हौदांत बुडालें. ह्यापुढें कौरव पांडवांचे नातेवाईक नाहींत, आणि पांडव कौरवांचे नातेवाईक नाहीत. श्रीकृष्णाचा हाडवैरी जसा जरासंध होता, तसा मी तुमचा हाडवैरी आहें असें मान. राजा, मी दुसरा जरासंधच आहें असें समज. शिशुपाल जिवंत असतांना जरासंधानें माझ्या शरिरांत संचार केला नाहीं, आणि त्यामुळें अग्रपूजेच्या सभेंत गप्प बसण्याची दुष्ट बुद्धि मला झाली. पण पांचालीच्या हंसण्यानें माझी चूक मला पटविली; भीमाच्या अहंकारानें माझ्या अंगांत जरासंधानें संचार केला; आणि कालाला उलटी कलांडणी देण्याचें बल कर्णाच्या बाणानें मला दिलें.—धर्मराजा, हौदांत पडण्यापूर्वीचा तो कौरव निराळा आणि हौदांतून बाहेर आलेला हा कौरव निराळा. सार्वभौमा, माझी अग्रपूजा आतांचे आतां तुला केली पाहिजे. धर्मराजा, तुझ्या हातांनीं जर माझी अग्रपूजा केली तर पांचालीच्या हंसण्याचें शल्य ह्या हृदयांतून निघणार आहे. पण तसें जर झालें नाहीं तर—

**द्रौप०:**—काय व्हायचें असेल तें होऊं द्या.—मी हंसलें.—कोण हंसणार नाहीं ? श्रीकृष्णाची आम्हीं पांडवांनीं बांधलेली पूजा अर्चा लाथाडून देऊन, माझ्या त्या देवाच्या देव्हाऱ्यांत ह्याला बसवून ह्याची पूजा करायची !—कोण हंसणार नाहीं ? ह्या विश्वाच्या रचनेंत हंसण्याचा जर कोठें उपयोग असेल तर तो असल्याच प्रसंगीं. कौरवेश्वरा, सर्व विश्व हंसलें, हंसत आहे, आणि हंसणार! मी स्वतःला धन्य मानतें, विश्वाचें हें हास्य माझ्या दंतपंक्तीवर प्रगट झालें; विश्वकार्य माझ्या देहानें केलें!

श्रीकृष्णाच्या विमल यशानें प्रगट होऊन सहज लीलेनें तुम्हांला धिःकारण्याचा मान मला दिला !

दुर्यो०:—हंसणें सोपें आहे, पण तें निस्तरणें— रडणें—कठिण आहे.

द्रौपदीः—श्रीकृष्णानें हांसविलें, श्रीकृष्णच दुसऱ्या कामांतून पार पाडून नेईल.—कौरवेश्वरा, श्रीकृष्णाचे गुण मी लहानपणापासून गाइले आहेत, त्याच्या पूजेचें बाळकडू लहानपणींच मला पाजलें आहे, आणि श्रीकृष्णाची कैवारीण म्हणून मला श्रीकृष्णांनीं आपली बहीण मानलें आहे. माझ्या भावाच्या अग्रपूजेचा हक्क हिसकावून घेऊं पाहणारांना धिःकारण्याचा आणि त्यांना हंसण्याचा अधिकार मला आहे. आपणांला अग्रपूजेचा मान पाहिजे ना? श्रीकृष्णाच्या पूजेंतल्या फुलांच्या प्रत्येक पाकळीगणिक पांडव निरनिराळ्या युद्धांना तयार होतील, आणि प्रत्येक पत्रीगणिक जीव खर्चावा लागला, तरी ही द्रौपदी जीव खर्चीं घालील.—रानावनांत फिरत असतांना ज्या विभूतीला पांडवांनीं देव म्हणून पूजिलें—तो श्रीकृष्ण—तो देव प्रसन्न होऊन पांडव सार्वभौमत्वाच्या शिखरावर चढले. दुःखाच्या वेळीं देव आठवावा, आणि वैभवाच्या वेळीं आठवूं नये, असले अधम पांडव नाहींत.

पद १७. [ गज्जल—पहाडी. चाल—'देखके दिदार' ].

**पांडवां सम्राटपदाला पोंचाविता तो जाहला;**
**भक्तिचा हाचि हात माझा महापुण्यें सज-**
**विला ॥ धृ० ॥ कंस पापी तो जरासंध परम**
**साहसें मारिला; उपभोगाची वेळ येतां स्वार्थ-**
**त्यागी राहिला ॥ १ ॥**

सांगावयाचें होतें कौरवेश्वराला, पांडव पाहिजे तर पुन्हां दरिद्री होतील, वनवास सोसतील, युद्ध लढतील, पण जिवांत जीव असेतों श्रीकृष्णाचीच अग्रपूजा करतील; आणि श्रीकृष्णाची निंदा भूतलावर कोणालाहि करूं देणार नाहींत.

दुर्यो०:—अग जा, कृष्ण तुझा भाऊ असेल, पांडवांचा देव असेल,



द्रौ०—पांडवां सम्राट पदाला पोंचविता तो जाहला. [ पृ. २२. ]

मला त्याची पर्वा नाहीं. सार्वभौमा, माझी अग्रपूजा तूं केली पाहिजेस, आणि माझा धांवा द्रौपदीनें देव म्हणून केला पाहिजे—

**द्रौपदीः**—मी हंसतें तुम्हांला, मी हंसतें.

**दुर्यो०ः**—सार्वभौमा, तूंहि ह्या हंसण्यांत सामील असशील तर—

**धर्मः**—द्रौपदी, मी तुला मघाशीं वृथा दोष दिला. कौरवेश्वरा, तुझ्या ह्या अग्रपूजेच्या मागणीसाठीं पाहिजे त्या युद्धाचा बोजा शिरावर घ्यायला हा धर्म तयार आहे; आणि तो बोजा श्रीकृष्णाच्या सेवेसाठीं असल्यामुळें तसल्या युद्धाचा प्रसंग मला अभिमानाचा, हौसेचा, आणि आनंदाचा वाटल्यावांचून राहणार नाहीं, हें कौरवांना कळावें म्हणून पांचालीच्या हास्यांत तसेंच हंसून मीहि सामील होत आहें.

**दुर्यो०ः**—अग्रपूजेच्या लढाईचें आव्हान, सार्वभौमा, हा कौरवेश्वर ह्या वेळीं तुला देतो आहे.—माझ्या आव्हानाला संमति देऊन धृतराष्ट्र-महाराज कौरवांच्या सेनेला ह्या युद्धावर पाठविण्याला तयार झाले तर थोड्याच दिवसांत हस्तिनापुरची सेना इंद्रप्रस्थावर स्वारी करील. पण बाबा त्या वृद्ध भीष्माप्रमाणें जर कृष्णाचे पक्षपाती झाले,—बाबांचें उत्तर येईतों मी येथेंच राहणार, आणि जरी विरुद्ध गेले तरी मी भीमाशीं आणि कर्ण अर्जुनाशीं द्वंद्वयुद्ध करून आपल्या आयुष्याची शहानिशा केल्याशिवाय इंद्रप्रस्थ सोडणार नाहीं.—सार्वभौमा, हें माझें द्वंद्वाचें आव्हान आपण स्वीकारलेंच पाहिजे.

पद १८. [ राग—अडाणा; ताल—झंपा. ]

घे सार्वभौमपद सौख्यराशी तुला, अग्रपूजा
मला वांटणीला ॥ धु० ॥ राजा स्वकुळिंचा
हा बळीसारिखा; कृष्ण परका सखा मानियेला
॥ १ ॥ मागणी ना पटे, भीमार्जुना हटें
हटकितों या क्षणीं मी रणाला ॥ २ ॥

[ दुर्योधन वगैरे जाऊं लागतात.

**धर्मः**—सुयोधना, हा धर्म सार्वभौमपदावर असेतों प्रत्येक योद्धयाची लढण्याची हौस पुरविली जाईल; पण धर्म आणि न्यायनीति ह्यांच्याकडे दुर्लक्ष केलें जाणार नाहीं. सुयोधना, तुझी इच्छाच असेल, तर मी तरी कसा कर्णार्जुनांचें आणि भीमसुयोधनांचें युद्ध टाळूं शकेन? पण स्थळ आणि वेळ पाहिली पाहिजे. सुयोधना, राजा धृतराष्ट्र यांची संमति घे; भीष्म-द्रोणांचा आशीर्वाद घे; रणमैदान तयार करूं, आणि मग होऊं द्या युद्ध. क्षत्रिय लढण्याकरितांच जिवंत असतात; लढणें टाळण्याकरितां नसतात. पण अविवेकानें आणि रागारागानें भलत्याच वेळीं भलत्याच ठिकाणीं लढून वीरांच्या धर्माला बट्टा लावूं नको, एवढेंच माझें मागणें आहे.

[ पडदा पडतो. ]

**पाहिला अंक समाप्त.**

---

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

[ **स्थळ**—इंद्रप्रस्थ; कौरवांच्या शिबिरासभोंवारचा बगीचा. शकुनी प्रवेश करितो. ]

**शकुनीः**—किती वेळ मी भणभण फिरूं? कांहीं युक्ति सुचत नाहीं.—गदायुद्धांत कौरवेश्वर मरून पडला तर—लढाई झाली तरी द्यूतच आहे; आणि लढाईत फांसा असाच पडेल, अशी हमी कोणी घ्यावी?—आहे हें हस्तिनापुरचें वैभव कां दवडावें? भानुमतीच्या म्हणण्यांत तथ्यांश नाहीं असें नाहीं. लढाई टाळूनच कार्यभाग साधला पाहिजे. [ भानुमती येते. ] काय भानुमती, कौरवेश्वराचा क्रोधाग्नि थोडा तरी शांत झाला आहे का?

**भानु०:**—मामांजी, शांत कसा होणार? आम्हां सर्वांची राख-रांगोळी केल्यावर तो क्रोधाग्नि शांत होईल. मामांजी, आपणच ही आग पेटविली, आणि आतां आपणच ती विझवली पाहिजे. आपण तसें नाहीं केलेंत तर मला चिन्ह बऱ्यांतलें दिसत नाहीं.

पद १९. [ राग—केदार; ताल—धीमा तिताला. चाल—'सौके हो' ]

**अग्नी हा धुमसत कुलनाशक, नोहे कुलदी-**
**पक ॥ ध्रु० ॥ पडली परम घोर ठिणगी, नवें**
**दुजें लाक्षाग्रहचि घरीं पावक ॥ १ ॥**

**शकु०:**—मीं ही आग पेटविली खरी; पण पांडव जळून खाक झाल्यावर, मीं ती विझवीन. मुली, तुमचें व पांडवांचें वैर निर्मळ नाहीं; त्यामुळें पुढें काय करायचें, हें तुम्हांला सुचत नाहीं.—अंध धृतराष्ट्र आपल्या मुलांवर पूर्ण प्रेम करतो खरा, पण त्या प्रेमांतून पांडवांच्या वैराचा झोत उत्पन्न होऊं

शकत नाहीं; कारण कुळाच्या लौकिकाची भीति त्याच्या आड येते. सुयोधनाला पांडव डोळ्यांत खुपतात खरे; पण स्वतःच्या शौर्याच्या अभिमानामुळें ह्या खुपऱ्या त्याला सहज फोडतां येत नाहींत. आणि मुली, तुला पांडवांची श्रीमंती हवी खरी; पण नवऱ्याला जरा दगदग सोसावी लागेलसें तुला दिसलें म्हणजे पांडवांच्या श्रीमंतीवरची तुझी नजर नवऱ्याच्या स्वास्थ्यांतच खिळून राहते. तळहातावरील फोडाप्रमाणें नवऱ्याला जपणाऱ्या बायका नवऱ्यासकट शत्रूच्या हातीं पडत असतात. तुला चिन्ह ठीक दिसत नाहीं. याचें कारण पांडवांची खरी वैरीण तूं नाहींस. मी पांडवांचा खरा वैरी आहें—[ पडद्यांत—" पांडवांचा खरा वैरी जर कोणी असेल—पांडवांचा खरा वैरी जर कोणी असेल "— ] पांडवांचा खरा वैरी मी आहें—मी पांडवांचा खरा वैरी आहे—कोण आहे तें ? हा मी पांडवांचा खरा वैरी आहे— [ शीलवती आणि मुलगा येतात.

शील०:—पांडवांचा खरा वैरी जर कोणी असेल, तर त्यानें ह्या गरीब मुलावर, आणि त्याच्या अन्नान्नगत झालेल्या आईवर दया करावी.—आम्ही दोघेहि उपाशी मरतों आहोंत.—राजसूय यज्ञांत अन्नाच्या राशीच्या राशी चोहोंकडे पडल्या असतांना आम्ही उपाशी मरतों आहों. उंची उंची कपड्यांची लयलूट चालली असतांना आम्हांला अंगभर वस्त्र नाहीं.—आपण पांडवांचे खरे वैरी असाल, तर मला घांसभर अन्न मिळेल; आपण पांडवांचे खरेखुरे वैरी असाल तरच माझ्या बाळाच्या अंगावरच्या ह्या चिंध्या दूर होतील.

भानु०:—अग, काल मीं तुला चांगलीं चांगलीं वस्त्रें दिलीं, आणि आज पुन्हां तुझ्या अंगावर, तुझ्या मुलाच्या अंगावर, चिंध्या !—मामांजी, गेले तीन दिवस आमच्या शिबिराच्या शेजारीं, ह्याच वेळेला ही अशी ओरडत राहिली, आणि तीनहि दिवस मीं हिला भरपूर अन्नवस्त्र दिलें.

शील०:—पण त्या अन्नांतील एक कणहि माझ्या पोटांत गेला नाहीं; आणि वस्त्रांतलें एक सूतहि माझ्या बाळाच्या अंगावर पडलें नाहीं.

भानु०:—कां, असें कां झालें ?

शील०:—आपण पांडवांच्या खऱ्या वैरीण नव्हे, असें ठरलें.

शकु०:—कोणीं ठरविलें हें, असें कोणीं ठरविलें ?

शील०:—माझ्या पतिराजांच्या हातांतल्या फांशानें ठरविलें.—महाराज, ह्या भिकारणीचें दैव कांहीं विचित्र आहे. माझे पतिराज पुरे जुगारी असून, फांशावर मिळविलेल्या अन्नवस्त्राशिवाय इतर अन्नवस्त्राला ते शिवत नाहींत, आणि कुटुंबांतल्या माणसांनाहि शिवूं देत नाहींत.

शकु०:—वारे जुगारी !—असावा तर असाच जुगारी असावा. जुगाऱ्यांचा हा राजाच समजला पाहिजे.

मुलगाः—हो, माझे बाबा राजे व्हायचे आहेत; आणि मी युवराज व्हायचा आहें.—ह्या युवराजाला थोडी भिक्षा घालता का ?—जर पांडवांचे तुम्ही खरे वैरी असाल—

भानु०:—जुगारानें मिळविल्याशिवाय जर कांहीं खायचें नाहीं, तर तूं भिक्षा कां मागतोस ?

शील०:—माझी सवत रूपवती आणि मी शीलवती, अशा आम्ही दोघीजणी पतिराजांच्या सेवेला असतों.—ती सध्यां आवडती आहे; मी नावडती आहें.—भिक्षेचें अन्न पणाला लावायचें; आम्हां दोघींपैकीं जी जिंकील तिनें तें सर्व घ्यायचें; पतिराजांनीं आणि तिनें त्यावर आनंद करायचा; आणि जुगारांत जी हरली असेल तिनें दुसऱ्या दिवशीं पुन्हां भिक्षेला जायचें; असा आमचा नित्यक्रम आहे.

मुलगाः—आणि इंद्रप्रस्थांत आल्यापासून आम्हीच रोज हरतों, आणि आम्हांलाच रोज भिक्षा मागावी लागते. आम्ही यज्ञांतलीं खूप पक्वान्नें आणतों, पण पांडवांची सुतळी का असेना, पणाला लावली—

शील०:—सवतीच्याच बाजूचा फांसा पडतो.—एकहि डाव माझ्या बाजूचा इतक्या दिवसांत नाहीं.—यज्ञाच्या अखेरच्या दिवशीं, नाना प्रकारच्या मौल्यवान जिन्सा लुटीकरितां धर्मराजानें मैदानावर मोकळ्या ठेवल्या होत्या, उचलतील तितकीं उंची उंची लुगडीं मीं उचललीं—

मुलगाः—मीं डोक्यावर एक लाडवांची पाटीच घेतली—

शील०:—पण सर्व सवतीनें जिंकून घेतलें.—आम्ही उपाशी, उघडीं-नागडीं,—पण तिची चैन चालली आहे !

मुलगा:—ती आणि बाबा खातात, पितात, राजासारखे नटतात, हंसतात, खिदळतात; आणि आम्हांला उपाशी भिक्षा मागायला बाहेर पाठवितात.

पद २०. [ राग-पिलु; ताल—खेमटा. चाल—'ऐसे पापी नर'. ]

**नारीनर सकल जुगारी; जग लहरी ॥ध्रु०॥**
**द्यूतरत पिता, तशीच माता, भटके पुत्र**
**भिकारी; धटिंगण तो छानछबेला, बाळपणाला**
**मग चौपदरी ॥ १ ॥**

शील०:—ह्या इंद्रप्रस्थांत कोणाच्याहि घरांत भिक्षा मागितली, तरी ती पांडवांच्या कैवाऱ्यांची !—पांडवांच्या वैऱ्याच्याच घरची जर भिक्षा आणलीस, तरच जुगार खेळतांना फांशाचें दान तुझ्या बाजूचें पडेल, असें पतिराजांनीं मला सांगितलें आहे. म्हणून म्हणतें, आपण जर पांडवांचे खरेखुरे वैरी असाल, तर ह्या उपाशी अबलेला आणि तिच्या ह्या मुलाला उपासमारींतून वांचविण्याचें पुण्य आपणाला लागेल.

शकु०:—पांडवांची किंवा पांडवांच्या कैवाऱ्याची वस्तु पणाला लाविली कीं जिंकली जाते ! फांसे असले आहेत ? खरें आहे हें ?

शील०:—खरें आहे, अगदीं खरें आहे.

मुल०:—तुम्ही पांडवांचे वरी खरेखुरे आहां ना ? तुम्ही बसा खेळायला, बाबांचें नेसायचें धोतर देखील तुम्ही हां हां म्हणतां जिंकाल !

शील०:—आणि माझ्या सवतीचे दागिने, लुगडें, चोळी, सर्व जिंकाल.

मुल०:—आणि मग आई, ती तुझी सवत नागव्यानेंच भिक्षा मागायला गेली पाहिजे; तूं आपलें फाटकें लुगडें देखील तिला नेसायला देऊं नकोस हं.

शील०:—फिरे ना नागव्यानें; माझें खेटर अडलें आहे तिला माझें फाटकें लुगडें द्यायला !

मुल०:—मी भाकरीचा एक तुकडा देखील तिला देणार नाहीं.--फांसा

आमच्या हातांत येईल, आणि पांडवांचें तिच्या जवळचें सगळें लुबाडून घेऊं.—असा फांसा टाकीन—तिला उपाशी मारली पाहिजे.—पण तुम्ही पांडवांचे वैरी खरेखुरे आहां ना ?

शकु०:—बाळ, मी पांडवांचा खरा वैरी आहें.—चला, तुमच्या बरोबर मी असा येतों, आणि तुमच्या घरचे हे फांसे आहेत तरी कसले हें पाहतों.—चला, ह्या पावलींच माझ्याबरोबर चला.—मुली, संकट समयीं माझा फांसाच माझ्या नवसाला पावणार, असें दिसतें.

[ शकुनी, शीलवती, आणि मुलगा जातात.

भानु०:—शकुनी मामांजींना त्याचा फांसाच नवसाला पावो, म्हणजे गदायुद्धांत तिकडचं कांहीं बरें वाईट होईल कीं काय, म्हणून माझ्या मनाला वाटत असलेली हुरहुर नाहींशी होईल.—मामंजींचें वैर त्यांची आवडती वस्तु जो फांसा, त्याच्यांत शिरल्यासारखें दिसतें!—उत्कट झालेल्या मनोविकारांची छाप सर्व आवडत्यांवर पडत असते

पद २१. [ राग—सिंधकाफी; ताल—धीमा तिताला. चाल—'मदकी भरी']

तळमळिला चळवळ बोला; कळकळीची ही
लीला ॥ ध्रु० ॥ उत्कट तो उसळत उटला,
निज परिवारीं पसरत पडला ॥ १ ॥

[ जाते.

---

## प्रवेश दुसरा.

[ स्थळ:—अक्षपालाचें घर. रूपवती अक्षपालाचे पाय चेपीत आहे. ]

रूप०:—मी अशी किती वेळ सेवा करूं ? हात दमून गेले !

अक्ष०:—फांसे काढ; मीं जिंकलें तर असें पाय चेपीत बसलें पाहिजे, तुं जिंकलेंस तर—

रूप०:—अन्नवस्त्राकरितां जुगार ठीक आहे; पण सेवेकरितांहि जुगार करायला पाहिजे ? सेवा प्रेमाची असते, जबरदस्तीची नसते; तशीच जुगाराच्या लहरींचीहि नसते.

अक्ष०:—तुझ्याप्रमाणेंच सर्व जग गुलाम आहे; प्रेमानें गुलाम कोणीच नाहीं; जबरदस्तीमुळें किंवा जुगारामुळें सर्व गुलाम होतात; आणि प्रेम झालें तरी मनाच्या लहरींच्या खेळांतील फांशाचें दानच होय.—फांसे काढ आणि मग बोल.—हे पहा फांसे—तूं माझ्याशीं वांकडें बोलती आहेस—आवडती राणी असून वांकडें बोलती आहेस—तेव्हां वांकडे तेरा तुझे—आणि मी जुगारांचा सम्राट, म्हणून चौदा चौकड्यांचें राज्य माझें—(फांसे टाकतो) जिंकलें, साफ जिंकलें, हरलीस तूं; बटकीप्रमाणें पाय चेपीत बैस.— दोन बायकांचा नवरा होणें आणि सम्राट होणें; सारखेंच. जितक्या बायका अधिक, तितका तो मोठा सम्राट !—मला दोन बायका तर आहेतच, आतां तिसरी एखादी मिळते का पहातों आहें.

[ शीलवती येते.

शील०—लोक तर म्हणतात, दोन बायकांचा दादला होण्यासारखें दुःख नाहीं म्हणून आणि इकडे तिसरी—

अक्ष०:—अग हो, दोन बायकांचा नवरा होऊं नये, हें खरें; पण तें कोणी ? जुगारी नसेल त्यानें. राज्य राखण्याहून बायका संभाळणें अधिक कठीण आहे;—होय, अधिक कठीण आहे—खरेंच कठीण आहे—पण जुगाऱ्याला सर्व कांहीं सोपें !

शील०:—स्वतः कांहीं करायला नको, आवडत्या बायकोला डोक्यावर नाचवावी—

अक्ष०:—पायाखालीं तुडवतों आहें—पहा—पहा—कशी सेवा चालली आहे !—खरा जुगारी आवडतीलाहि डोक्यावर नाचूं देत नाहीं—

शील०:—आपल्या नाहीं तर माझ्या डोक्यावर नाचूं देतां ना ?—नावडतीला—मला—भीक मागत, काबाडकष्ट करीत, उन्हातान्हांत फिरवावी; आणि माझ्याच भिक्षेवर ऐदोबाप्रमाणें—



अक्ष०—तुमच्या जीभेच्याच लाथा लांबत चालल्या. [ पृ. ३१. ]

अक्ष०:—आम्ही जुगारी ऐदोबा असतों, हें खरें; पण कोणाची ताप आमच्यापुढें चालवूं देत नाहीं.—खरा तलवारबहादूर मरेतों जिंकण्याची धडपड करीत असतो; तसे आम्ही जुगारी पुरे बेपत्ता होईतों असेल नसेल तें पणाला लावीत असतों. खऱ्या योद्धयांत आणि जुगाऱ्यांत काडीचाहि फरक नाहीं. योद्धा मरतो, किंवा राज्य करतो; जुगारी लक्ष्मींत लोळतो, किंवा लक्ष्मीला लाथाडतो;–तुला लाथ बसली का ?

रूप०:—पुरे झाली ही सेवा; शेवटीं फळ असेंच मिळायचें !—होऊं द्या हिला आवडती; मी आपली नावडतीच होतें कशी ! लाथा खाण्यापेक्षां नावडती होणें बरें.

शील०:—मी तरी कशाला आवडती होतें ! माझ्या भिक्षेवरच तुमची चैन चालली आहे कि नाहीं !—आवडती होऊन लाथा कोण खाणार ?

रूप०:—कोण म्हणजे, तूं खाणार.

शील०:—खायला गोड गोड पाहिजे, लाथा नकोत ?–नेसायला उंची उंची लुगडीं पाहिजेत, लाथा नकोत ?—दागिने अंगाखांद्यावर पाहिजेत, लाथा नकोत ?—माझा छळ, इतक्या दिवस झाला आहे. आतां नाहीं मी लाथा खायची.

रूप०:—मीं दुसऱ्यापणीं लग्न केलें—लाथा खायला नव्हे.

शील०:—ह्यांच्या मर्जींतून मला उतरण्याकरितांच ना ?—घे लाथा.

रूप०:—मी इतकी नटतें, सजतें, लाथा खाण्याकरितां नव्हे.

शील०:—नटून थटून लाथांचाच सुकाळ घरांत माजविलास ना ? घे लाथा.

अक्ष०:—जरा थांबा, माझ्या पायांच्या लाथांपेक्षां तुमच्या जीभेच्याच लाथा लांबत चालल्या !— मी जुगारी आहें; पुन्हां सांगतों, मी जुगारी आहें.—फांसा टाकून मला जिंका, आणि मग एकीमेकींना लाथा मारा—फांसा टाकून पण लावायचा नसेल, तर दोघीहि चालत्या व्हा.— मी दोन दोन बायका सांभाळतों, तीन तीन, चार चार सांभाळतों.—सगळ्या घरांतून बाहेर पडल्या, तरी मला पर्वा नाहीं, म्हणून मी सांभाळूं शकतों.—राज्य बुडेल अशी फिकीर ज्याला असेल, तो राज्य चालवूं

शकत नाहीं. बायको उठून जाईल, फिकीर केली, कीं पडला पाय बाहेर!—बेफिकीर राहणं, ही यशाची गुरुकिल्ली आहे; जुगाराच्या शाळेशिवाय इतर कोणत्याहि शाळेंत बेफिकिरी शिकि नाहीं.—ह्या जुगाऱ्यापुढें तुम्ही किती बेफिकीर होणार? किती होणार? मुरदाडपणानें किती किती हंसणार? निर्लज्जपणाचा कांदा जुगारी; समजलांत.—ये अशी तूं, अशी थाटानें बैस; चेप पाय काढ तुझी भिक्षा, आणि लाव पणाला.—माझ्या पुढें तुझ्या निर्ल ऐट चालायची नाहीं.— मी निर्लज्जांचा राजा–सम्राट आहें.—

रूप०:—मी निर्लज्जांची राणी—

शील०:—मी निर्लज्जांची महाराणी आहें—

[ मुलगा आणि शकु

मुल०:—मी निर्लज्जांचा युवराज असून, निर्लज्जांचा खरा हे आहेत.—बाबा, हा राजा तुमचे फांसे माझ्याजवळ मागत होत

पद २२. [ राग–देस; ताल–त्रिवट. चाल–'कान्हा नैनोंके खि

राजा फसवी मुलांना; लज्जा कसली धरी ना
॥ ध्रु० ॥ जगांत खुशाल हांसा; पळवील
फांसा ही कपटमूर्ती जाणा ॥ १ ॥

शकु०:—माझी जुगारावरची भक्ति अद्वितीय आहे, अशी दिवस मला घमेंड होती; पण जुगाऱ्यांच्या ह्या सम्राटांच्या दर्श घमेंड आतां मावळली आहे. पृथ्वीतलावर आज काल दोन नादिष्ट म्हणून प्रसिद्ध आहेत. गांधारदेशाचा राजा हा शकुनी, आणि सम्राट धर्मराज, हीच ती जोडी होय.

अक्ष०:—मी दोघांचाहि गुरु होण्याला लायक आहें. तुम्ही दो सम्राटाचे मांडलीक आहां.

शकु०:—मांडलीक म्हणूनच येथें आलों आहें. धर्मराजाव ताण व्हावी, म्हणून हा मांडलीक सम्राटाची आराधना करीत आहे.

अक्ष०:—गांधारदेशाच्या राजा,माझ्या मांडलीका, तूं प्रथम म आलास, तेव्हां तुझा जय झालाच पाहिजे.—हा सम्राट हीं दोन



गुल०—राजा फसवी मुलांना. [ पृ. ३२. ]

आवडतें आणि नावडतें राज्य—एकमेकांशीं फांशांच्या जोरावर कसें झुंजवितों—फांसे टाकून ह्या कोंबड्या कशा झुंजवितों—माझी आवडती तिसरी कोंबडी तूं होऊं इच्छितोस?

शकु०:—होय, महाराज.

अक्ष०:—( स्वगत ) निर्लज्जांचा खरा अर्क आहे.—( उघड ) शीलवती, तुझी आजची भिक्षा पणाला लाव, आणि माझ्या फांशांचा चमत्कार ह्या तिसऱ्या कोंबडीला—माझ्या तिसऱ्या राज्याला पाहूं द्या.

शकु०:—आज ह्यांची भिक्षा पणाला लावण्याचें कारण नाहीं.—ह्या तिसऱ्या राज्यानें आणलेला करभार पणाला लावावा.—आपल्या जवळचे फांसे जर अद्वितीय ठरले, तर माझ्या गंधार देशांतील अक्षवती नगरीचें राज्य मी गुरुदक्षणा म्हणून आपणाला अर्पण करणार आहें.

अक्ष०:—मी कोणतीहि वस्तु पणाला लावून जिंकल्याशिवाय घेत नसतों. अक्षवतीचें राज्य पणाला लाव, तें मी जिंकतों.

शकु०:—माझे तीन दाणे—आपले अठरा चौकडे.—महाराज, मी राजसूय यज्ञाला यायला निघालों, त्या वेळीं अक्षवतीच्या लोकांनीं पांच पांडवांच्या आणि द्रौपदीच्या सुवर्णाच्या मूर्ती करून, धर्मराजाला अर्पण करण्याकरितां माझ्यापाशीं दिल्या.—मी पांडवांना एक कपर्दीकेचाहि करभार अर्पण केला नाहीं.—त्या सहाहि मूर्ती आणि अक्षवतीचें राज्य मी पणाला लावतों; पण इच्छा अशी आहे कीं, आपण राजे झाल्यावर ते फांसे मला मिळाले पाहिजेत.

अक्ष०:—फांसे तुला बक्षीस देईन; अक्षवतीचें राज्य जिंकीन आणि फांसे बक्षीस देईन, असा माझा पणच आहे. जरासंधाच्या नगरींत सम्राटाएवढी संपत्ति माझ्या बाबांनीं मरतेवेळीं माझ्या स्वाधीन केली. ती सर्व संपत्ति अवघ्या एका वर्षांत मीं जुगारांत घालविली. मी सर्व नगरीला जुगारी बनवीत आहें असें पाहून, जरासंधानें मला नगरींतून हांकून लावलें, आणि स्मशानांत वास करण्याची आज्ञा केली.—मी जुगार सोडला नाहीं, बारा वर्षें स्मशानांत जुगार खेळत काढलीं. शेंवटीं जरासंध जेव्हां स्मशा-

नांत जळायला आला; तेव्हां जिवंत असतांना त्याला मी जुगारी करूं शकलों नाहीं तरी मेल्यावर निदान तो जुगारी ठरावा म्हणून, जळत्या चितेंतून त्याचीं हाडें बाहेर काढून, त्या हाडांचे हे फांसे बनविले !—मग स्वप्नांत जरासंधानें माझे पाय धरिले आणि सांगितलें, हे फांसे तुला राजा करतील आणि जरासंधाच्या शत्रूला धुळीला मिळवतील.—शकुनी, तूं पांडवांचा खरा वैरी असशील, तर हा डाव टाकल्याबरोबर मी अक्ष-वतीचा राजा होईन; आणि तूं ह्या फांशांचा मालक होशील.—माझे अठरा—तुझे तीन दाणे—जिंकलें—अक्षरावतीचें राज्य जिंकलें—ह्या सोन्याच्या सर्व प्रतिमा जिंकल्या !

**शकु०:**—अक्षवतीच्या महाराजांना मी प्रणाम करतों आहें.

**अक्ष०:**—मला हंसत होता नव्हे ? झालों किं नाहीं राजा ! आतां तुम्ही दोघीहि माझ्या आवडत्या राण्या हं. ( **दोघींच्या खांद्यावर हात ठेऊन** ) आम्हां जुगाऱ्यांचें असेंच असतें, जिंकलें किं बायका जवळ पाहिजेत; पुरुषांचें दर्शन आम्हाला नकोसें होतें. तुम्हीं ते फांसे घ्या आणि चाला-यला लागा.—जिंकलें किं निर्लज्जपणानें चैन करणाऱ्या जुगाऱ्यांच्या इतके हलकट कोणीहि होऊं शकत नाहींत; हें आपणांला माहीत आहेच,—जा आतां आपण, मला मनसोक्त ऐषआराम करूं द्या.—( **शकुनी जाऊं लागतो** )—पण हें पहा, थोडा वेळ परत या.—तुम्हाला त्या जरा-संधाच्या हाडांची मख्खी सांगायची राहिली आहे.—तुम्ही जरा बाजूला सरा.—आम्ही जुगारी बायकांच्याच मेळ्यांत नेहमीं कां असतों, ह्याचें कारण तुम्हाला माहीत आहे ?

**शकु०:**—नाहीं; कोणचें कारण ?

**अक्ष०:**—हे तुमचे सोन्याचे पांडव आणि द्रौपदी, मी पणाला लावतों.—थोडा जुगार खेळा,—फांशांचीहि परीक्षा होईल.—थोडा जुगार खेळा म्हणजे जुगाऱ्यांचा ओढा बायकांच्याकडे कां असतो, तें ध्यानांत येईल आणि फांशांची परीक्षा होईल.—हा नकुल मीं पणाला लावला.

**शकु०:**—जिंकला; जिंकला !

अक्ष०:—हा अर्जुन मी पणाला लावला.

शकु०:—जिंकला; जिंकला !

अक्ष०:—हा भीम—भीम—पणाला लावला आहे.—भीम, भीम, भीम—कां फांसे हातांत हालत नाहींत ?—भीमाचें नांव ऐकलें म्हणजे जरासंधाची हाडें मेल्याहून मेलेलीं होतात.—वाजवा हातांत फांसे; हालतात का पहा.—अहो, त्यांतलें खरें मर्म असें आहे कीं, जुगारी म्हणजे निर्लज्जांतला निर्लज्ज, आणि हलकटांतला हलकट; जुगाऱ्याच्या निर्लज्जपणावर रामबाण औषध म्हणजे आडदांडानें डोक्यांत घातलेला सोटा होय.—निर्लज्ज भेटला किं चोप द्यावा, दुसरी मात्रा लागू पडत नाहीं. आणि म्हणून आडदांड भीमाला सर्व जुगारी आपला वैरी समजतात, आणि बायकांना तेवढें सभोंवतीं गोळा करितात.

शकु०:—खरें आहे महाराज.—भीमाचें नांव ऐकल्यावरोबर हे फांसे हालेनासे झाले !

अक्ष०:—भीमाला नाहीं मी आतां पणाला लावीत.—त्याचें नांव सोडून देतों.—राहिलेल्या भावांसकट धर्माला पणाला लाविलें आहे.

शकु०:—जिंकलें; जिंकलें !

अक्ष०:—द्रौपदीला पणाला लाविली आहे.

शकु०:—जिंकली, जिंकली !

अक्ष०:—आतां शंका राहिली नाहीं ना ?—जा, ते पांडव, ती द्रौपदी, ते फांसे घेऊन जा.—आम्हाला ऐषआराम करूं द्या आतां.

शकु०:—अक्षवतीचे महाराज, येतों मी. [ सर्व घेऊन जातो.

मुल०:—बाबा, ते सोन्याचे पांडव मला खेळायला पाहिजे होते.

रूप०:—त्या द्रौपदीचे दागिने मी केले असते.

शील०:—पांडवांना अंगाखांद्यावर—

अक्ष०:—आम्ही आतां राजे झालों आहोंत—आपणांला काय कमी ? अक्षवती नगरींत गेल्यावर चैनच चैन !—अक्षवती नगरींत नुसत्या बायकांना मी राहूं देईन;—

मुल०:—आणि मी बाबा ?

अक्ष०:—हाकललेल्या पुरुषांची नवीन नगरी स्थापून तेथलें राज्य तुला देईन. [ पडदा. ]

---

## प्रवेश तिसरा.

[ स्थळ—कौरवांचें शिबिर. दुर्योधन येतो. ]

दुर्यो०:—

पद २३. [ राग—सोहा कानडा; ताल—त्रिवट—चाल—'इह सुनके हलधर' ]

**प्रिय मोक्षाहुनिहि महत्त्वाकांक्षा; प्राप्त होत नाहीं**
**गदादीक्षा, पुरवली येथहि मज भिक्षा**
**॥ ध्रु० ॥ मारुनि समरीं शौर्यानें अरि,**
**उतरवितों रिपुचा नक्षा ॥ १ ॥**

मला तर केव्हां द्वंद्वयुद्ध खेळेनसें झालें आहे; आणि ही भानुमती तर माझ्या अगदीं विरुद्ध ! आम्हां वीरांना युद्धांत काय मौज वाटते, तें हिला काय सांगूं ? शकुनी मामाहि तिच्याच बाजूचे !—आली—मामांचा कांहीं तरी निरोप घेऊन आली ! [ भानुमती येते. ] मामांना माझें म्हणणें पटवून आलीस ना ?

भानु०:—माझें म्हणणें मामंजींना पटलें; आपलें कांहीं पटलें नाहीं.—शिवाय त्या फांशांची परीक्षा आम्ही एकसारखी घेत होतों—

दुर्यो०:—मामांच्या परिक्षेला उतरले का ते फांसे ?

भानु०:—पुरे उतरले—कामधेनु घरांत चालून आली हो,—कामधेनु आहेत ते फांसे !—मग खरेंच गडे लढण्याचा हट्ट काय म्हणून ?

दुर्यो०:—तुम्हां बायकांना लढाईची मौज समजायची नाहीं.—युद्धांत माझें कांहीं बरें वाईट होईल, म्हणून तुला भीति वाटतें आहे.—रणांगणा-

वर पडलें म्हणजे स्वर्गाचें द्वार उघडतें, आणि अप्सरा गळ्यांत माळा घालतात हें ठाऊक आहे तुला भानुमती ?

**भानु०**:—धर्मराजाचा संचार अंगांत झालेला दिसतो !—जरासंधाचा संचार खोटाच एकूण !—मी म्हणतें, मी निवर्तल्यावर आपण अगदीं म्हातारपणीं भीमाशीं गदायुद्ध करावें. मरण सर्वांनाच आहे; तें टळत नाहीं. तें आलें म्हणजे एखाद्या रोगानें मरण्यापेक्षां, भीमाशीं लढत पटदिशीं स्वर्गांत अप्सरांत जाऊन पडलेलें कांहीं वाईट नाहीं.—पण तरुणपणीं, सर्व स्वर्गसुख येथें असतांना—मला अप्सरेहून अधिक सुंदर तूं आहेस म्हणून आपण नेहमीं म्हणत असतां, तें खोटेंच वाटतें ! जो येथलाहि स्वर्ग भोगतो आणि शेवटीं चुटकीसरसा वरच्या स्वर्गांत हजर होतो, तो खरा भाग्यवान्, खरा शहाणा, खरा वीर. मामंजी सांगतात, तसें वागण्यानेंच पांडवांवर ताण होणार आहे. [ शकुनी येतो.

**शकु०**:—कौरवेश्वरा, माझा व्यूह बरोबर जुळला आहे. धर्मराजाकडे चल; माझ्या बोलण्याला नुसतें होयला होय, तूं आणि कर्ण म्हणा; पांडवांचे धिंडवडे वाजवतों.—मयसभा तुझी समज, सम्राट्पद तुझें समज—

**दुर्यो०**:—माझी अग्रपूजा—

**भानु०**:—मयसभा काय, अग्रपूजा काय, आणि साम्राज्य काय, स्वर्गीय उपभोग पृथ्वीवर भोगावेत म्हणूनच पाहिजेत ना ? ऐश्वर्याशिवाय वीरांच्या पराक्रमाला काय किंमत आहे ? ऐश्वर्याची इच्छा जर नसली आणि गदायुद्धाचीच नुसती खुमखुमी असली, तर भीमाशीं युद्ध कशाला?—हिमालयावर जन्मभर गदा हापटत बसा, कोण नको म्हणत आहे ?—राजाच्या जन्माला न येतां लांकुडतोड्याच्या जन्माला येऊन, आपल्या बाहूंतल्या शक्तीला राबवायचें होतें ! येथला स्वर्ग वरच्या स्वर्गाच्या आड येणारा नसतांना, मग मला नाखूष कां करतां ?

**दुर्यो०**:—मामा, हिच्या पुढें माझें कांहीं चालत नाहीं. चला, तुमचा बेत मला समजून सांगा, मी निमूटपणानें ऐकतों—

शकु०:—अरे, भोळसट द्रौपदीला तुझी दासी करतों. चल माझ्याबरोबर—

दुर्यो०:—पुरुषांचें दैव बायकांच्या हातीं असतें. [दुर्योधन आणि शकुनी जातात.

भानु०:— अंगांत शक्ति असली, तरी ती कोठें आणि कशी उपयोगांत आणायची हें समजावें लागतें. पुरुषांहून बायकांनाच तें अधिक चांगलें समजतें.

पद २८. [ राग—देसकार; ताल—त्रिवट; चाल—'जागो जागाजि' ]

पुरुषासि स्त्री ज्ञानमाला; सुखद समय,
अशुभ समय, भेद कळे सहज तिला
॥ ध्रु० ॥ पुरुष वपुसि अर्पी शौर्याला, इह
लोकीं बहु दिन सुखविलास फळ मिळवी
अबला ॥ १ ॥

[ जाते.

---

## प्रवेश चौथा.



[ स्थळ— मयसभा; शकुनी आणि विदुर प्रवेश करितात. ]

शकु०:—सुयोधनाच्या विनंतीला मान देऊन धृतराष्ट्र महाराजांनीं आपणाला पाठविलें, आणि आपणहि येथें आलां, हे कौरवांवर मोठे उपकार न झाले. विदुरासारखा नीतिनिपुण आणि व्यवहारचतुर कोणीहि नाहीं, अशी आपली ख्याति आहे; तेव्हां आपल्या आगमनानें, विदुरमहाराज, माझ्यासारख्या वृद्धाला सनाथ झाल्यासारखें वाटून माझी काळजी दूर व्हावी, यांत आश्चर्य नाहीं.

विदु०:—शकुनिमहाराज, धृतराष्ट्राकडे पाहून मी येथें आलों आहें खरा; पण येथें येण्यांत मला बिलकुल सुख नाहीं. द्यूताच्या म्हणा किंवा युद्धाच



दुर्यो०—पुरुषांचें दैव बायकांच्या हातीं असतें. [ पृ. ३८. ]

म्हणा, दोनहि प्रसंग जे पुढें दिसत आहेत, ते असेच आहेत कीं, राजा धृतराष्ट्रानें, दुर्योधनाला टाकून देऊनच स्वतःला निपुत्रिक म्हणवून घेण्याला तयार होऊन, स्वधर्माचें रक्षण केलें पाहिजे.–पण पुत्राला टाकण्याला राजा धृतराष्ट्र तयार नाहीं—

**शकु०:**—तीच मोठी आडकाठी आहे.–गांधारी तयार नाहीं, धृतराष्ट्र तयार नाहीं.–मला एक वेळ असें वाटतें, तूं माझा भाचा साफ साफ नव्हस, असें सुद्धां स्वच्छ सुयोधनाला सांगावें–माझ्या शब्दावर आपला विश्वास बसणें शक्य नाहीं, हें मी ओळखून आहें.–जाऊं द्या तो विषय.–आपण येथें आलां, माझ्या मस्तकावरचा बोजा हलका झाला, हें खरें—

**विदु०:**—आपलें मन स्वस्थ झालें खरें; पण दुःख म्हणजे काय असतें तें नीटपणें मला समजावें म्हणून ह्यापुढें मी जिवंत राहणार, असें मला वाटतें !–जा तुम्ही, धर्मराजाच्या भेटीला सुयोधनाला घेऊन या. मी धृतराष्ट्राचा निरोप धर्मराजाला कळविलाच आहे–सुयोधनाच्या देखत पुन्हा कळविला म्हणजे, माझ्या कर्तव्यांतून मी सुटलों.–जा, सुयोधनाला घेऊन या. [ **शकुनी जातो.** ] धृतराष्ट्राच्या निरोपाला उलट उत्तर काय द्यावयाचें, ह्याचा विचार धर्मराज ह्या वेळीं आपल्या भावांबरोबर करीत आहे.–माझा सल्ला मी आपण होऊन द्यावा, असें मला क्षणोक्षणीं वाटतें; पण निरोप्या पडलों.–मनाची चोहोंकडून कशी कुचंबणूक होते आहे.–पांच पांडवांशिवाय मी माझे विचार येथें कोणापाशीं बोलूं ? ऐकून घ्यायला पात्र तरी कोण आहे? श्रीकृष्ण येथें ह्या वेळीं असता, तर त्याच्या पुढें डोळ्यांतून अश्रु गाळून हृदय हलकें तरी केलें असतें !–श्रीकृष्णा, तुझ्या ऐवजीं–ही कोण–पांचाली येते आहे.–सर्व विचार भडभडून बोलून दाखवून, स्वतःच्या मनाच्या जाचणींतून सुटण्याला द्रौपदीच योग्य स्थान आहे खरी, पण तिच्या कोवळ्या मनाचें शांतवन हा वृद्ध मग कसा करणार ?

[ **द्रौपदी येते.**

**द्रौप०:**—विदुरमामंजींना ही पांचाली नमस्कार करते आहे.

**विदु०:**—तुझें कल्याण असो.

**द्रौप०**:—तिकडची गांठ घेऊन आपण शकुनिमहाराजांशीं बोलत होतां, म्हणून पुढें आलें नाहीं. आपण असे दुःखी कष्टी कां दिसतां? राजसूय यज्ञाच्या समाप्तीनंतर आपण येथून हस्तिनापुराला गेलां, त्या वेळीं आपण असे दुःखी कष्टी नव्हता—

**विदु०**:—पांचाली, थोड्या वेळानें जी गोष्ट तुला समजणार, तीच आतां मी तुला सांगतों आहें, ती ऐकिलीस म्हणजे माझ्या दुःखाचें कारण समजेल.

**द्रौप०**:—अशी कोणती ती गोष्ट?

**विदु०**:—मयसभेंत थोड्या दिवसांपूर्वीं, तुम्हां सर्वांच्या देखत अग्रपूजे-करितां सुयोधनानें युद्धाचें आव्हान दिलें; आणि शकुनीनें सुचविलेली तडजोड जर मान्य नसेल तर, धृतराष्ट्रमहाराजांना त्या आव्हानाला उचलून धरणें भाग आहे, असें धृतराष्ट्रमहाराजांनीं मला सांगितलें आहे.

**द्रौप०**:—काय, धृतराष्ट्रमामंजांना अग्रपूजेचें भांडण मान्य आहे काय? भीष्म—द्रोण ह्यांच्या सारख्या तपोवृद्धांची आणि वयोवद्धांची संमति त्या आव्हानाला आहे काय?

**पद** २५. [ राग—बागेश्री; ताल—त्रिवट. **चाल**—'अपराध क्षमा करुनियां' ]

**ठरला जणु मत्सर राजा; वृद्ध तरुण बांधिती**
**पूजा ॥ ध्रु० ॥ होत सहज सुख तरुणपणाला,**
**वृद्धदशा सोडी सुखलीला; सह्य तरिच पर—**
**विभव मनाला; हाहि नियम विलया आजि**
**गेला ॥ १ ॥**

भीष्माचार्यांनीं आणि द्रोणाचार्यांनीं तर श्रीकृष्णाचीच अग्रपूजा झाली पाहिजे, असा हट्ट धरिला होता!

**विदु०**:—होय, सुयोधनानें जर तसा हट्ट धरिला नसता, तर धृत-राष्ट्रमहाराजांच्याहि मनांत असें आलें नसतें.—मुली, जेथें सारखा पराक्रम नसतो, पराक्रमाचा नुसता भास असतो, तेथें देखील मत्सर पेट घेतो!

6713

जेथें पराक्रम सारखा सारखा आहे, तेथें मत्सर उत्पन्नच न होणें शक्य आहे काय ?

**द्रौप०:**—मामंजी, मला हें समजतें; पण गदायुद्धांत आणि धनुर्युद्धांत पांडवांवर ताण करण्याचें तर बाजूलाच राहूं द्या, पण बरोबरीहि करण्याचें सामर्थ्य कर्ण–दुर्योधनांत नाहीं; ही गोष्ट नवी नाहीं. दोनतीनदां तावून सुलाखून खरी ठरली आहे. द्रोणगुरूंचें शिक्षण संपल्यावर परिक्षेच्या मैदानांवर हेंच ठरलें; मत्सरानें पेटविलेल्या लाक्षागृहाच्या अग्नीनें हेंच ठरलें; माझ्या स्वयंवराच्या वेळीं हेंच ठरलें, खांडववनांत हेंच ठरलें; दिग्विजयानें हेंच ठरलें. आतां त्यांच्या मत्सराला आम्ही भीक घालणें म्हणजे मत्सरच जगाचा शास्ता आहे असें कबूल करून, स्वतःच्या देवाच्या मूर्ती देवळांतून बाहेर फेंकून देण्यासारखें नाहीं का ?–दुर्योधनाच्या मत्सरानें धृतराष्ट्रमहाराजांना कां ग्रासावें ?

**विदु०:**—मुली, जगाची रहाटी समजण्याची शक्ति तुझ्या अंगीं उपजत आहे. ह्या वृद्धानें विचार कर--करून ती शक्ति कष्टानें प्राप्त करून घेतली आहे. तेव्हां तुला समजत नाहीं, असें मी कसें म्हणूं ? कर्ण-दुर्योधन अनुभवानें कमी ठरलेले आहेत; पण कौरवांचें सिंव्हासन नुसत्या कर्ण-दुर्योधनाच्या सामर्थ्यावर उभें नाहीं. भीष्म-द्रोणासारखे आजिंक्य वीर त्या सिंव्हासनाचे नोकर आहेत, आणि जरासंधाच्या पक्षाचे असंख्यात योद्धे त्याचे पाठीराखे होणारे आहेत, हें तूं विसरूं नकोस.

**द्रौप०:**—मामंजी, लहान तोंडीं मी मोठा घांस घेतें, म्हणून माझ्यावर राग करूं नका. भीष्म--द्रोणासारखे अजिंक्य वीर आणि जरासंधाचे अनुयायी, ह्यांना विचारांत न घेतां पांडवांनीं दिग्विजय आरंभला, असें कसें होईल ? श्रीकृष्ण आमचा सखा, ह्याचा अर्थच असा आहे कीं, जगांतल्या अजिंक्य शक्तींचा ओढा आमच्याकडे आहे; आणि ज्यांचा ओढा आमच्याकडे नाहीं, त्या शक्ति आम्हांला जिंकतां येण्यासारख्या आहेत.—विश्वसख्याच्या शक्तीचे कण दुसऱ्याच्या परड्यांत जरी पडलेले असले, शरिरानें नाहीं तरी मनानें ते आमचे आहेत.—भीष्म--द्रोण

मनानें आमचे आहेत; म्हणूनच त्यांनीं श्रीकृष्णाच्या अग्रपूजेच्या वेळीं तितकी हौस दाखविली. मामंजी, पांडवांच्या चरित्राची नदी श्रीकृष्णाच्या चरित्रांत मिसळून एकजीव झाली आहे. श्रीकृष्णाचें जें पुण्य, तेंच आमचें पुण्य; श्रीकृष्णाचे जे स्नेही, तेच आमचे स्नेही; श्रीकृष्णाची कीर्ति ऐकून ज्यांना आनंद वाटतो, त्यांना आमचेंहि वैभव पाहून सुखच होतें. श्रीकृष्णाला आमच्यांतून निराळा काढून आमच्याकडे पाहूं नका.

पद २६. [ राग—पहाडी; ताल—खेमटा. चाल—' करोना कोई ' ]

**विराट ज्ञानी कोंदटला सुमनीं ॥ ध्रु० ॥**
**सुमन रेणु चराचरभुवनीं, परि तें कृष्ण जाण;**
**कणकण असे महाजन, कारण मागें उभा धनी ॥ १ ॥**

भीष्म-द्रोणांचा आणि जरासंधाच्या अनुयायांचा विचार श्रीकृष्णाची अग्रपूजा करणाऱ्यांनीं केला नाहीं, असें आपण कसें म्हणतां ?

**विदु०:**—मुली, तुझें म्हणणें खरें आहे; पण भीष्म-द्रोणांचा सेवाधर्म ध्यानांत घेऊन, धृतराष्ट्र पांडवांची बरोबरी, श्रीकृष्णाच्या चरित्रांत न मिसळतांहि करूं पाहतो आहे. श्रीकृष्णाची पुण्याई त्याला माहीत नाहीं असें नाहीं; आणि म्हणूनच शकुनीच्या तडजोडीला त्यानें संमति दिली आहे.

**द्रौप०:**—कोणती ती तडजोड ?

**विदु०:**—श्रीकृष्णाची अग्रपूजा, भीष्म-द्रोणाप्रमाणेंच कर्ण-दुर्योधनहि मान्य करण्याला राजी आहेत—

**द्रौप०:**—मग आम्हांला काय आणखी पाहिजे ? श्रीकृष्णाची निंदा आम्ही बंद पाडली; आमच्या आयुष्याचें सार्थक्य झालें ! ह्यापलीकडे आम्हाला आणखी कांहीं नको. हा आनंद काय कमी आहे काय ?

**विदु०:**—आणि तुमचा हा आनंद जर खरा असला, तर धृतराष्ट्रमहाराज पांडवांना विनंति करीत आहेत, तुमच्या ह्या आनंदाला धक्काहि न लावतां माझ्या मुलाच्या आनंदाची काळजी वाहूं द्या. मयसभेचें वैभव सुयोधनाच्यानें पाहवत नाहीं; तेव्हां पांडवांनीं द्यूत खेळून—



भीम—आम्ही साफ द्यूत खेळणार नाहीं.

[ पृ. ४३. ]

**द्रौप०**:—द्यूत खेळून ?

**विदु०**:—होय, द्यूत खेळून मयसभेपासून सर्व वैभव पणाला लावावें; आणि साम्राज्यसत्तेला चढण्या इतके नाहींत, किंवा अग्रपूजा संपादण्याइतके नाहींत, तरी पांडवांचें वैभव भोगण्याइतके कौरव दैववान आहेत, अशी शेखी मिरविण्याचा मार्ग सुयोधनाला मोकळा करून द्यावा. द्युताच्या तडजोडीची मागणी धृतराष्ट्रातर्फे पांडवांपुढें मांडण्याकरितां हा विदुर इंद्रप्रस्थाला आला आहे. [ भीम येतो.

**भीम**:—आम्ही साफ द्यूत खेळणार नाहीं. काय म्हणून द्यूत खेळायचें ? ह्या भीमाच्या मनगटांत सर्व कौरवांचा चेंदामेंदा करण्याची शक्ति असतांना द्यूत काय म्हणून ? द्यूत दुर्बलांकरितां आहे; कपट्यांकरितां आहे.—प्रत्येक पावलागणीक धोपट मार्ग आणि राजरस्ता उत्पन्न करण्याची धमक ज्यांच्या शरिरांत, त्यांनीं पुढचा मार्ग कोणता हें फाशांना काय म्हणून विचारावें ? ह्या भीमाचा पाय जेथें पडेल, तेथें दैवानेंहि हात जोडून उभें राहिलें पाहिजे; ह्या भीमाची गदा जेथें संचार करील, तेथें दैवानेंहि खेळत राहिलें पाहिजे; ह्या भीमाला पाहिल्यावर, फांशांत लपून बसणाऱ्या दैवानें पोबाराच केला पाहिजे.—मी जिवंत फांसा आहें; मी जिवंत जुगार आहें; मी जिवंत दैव आहें. कौरवांना फांशांचीच हौस आली असेल, तर ह्या फांशाशीं खेळा; जुगारच खेळायचा असेल, तर ह्या गदेशीं खेळा; दैवच पहायचें असेल, तर ह्या छातीवर डोकें हापटून ललाटींच्या रेषा पाहून घ्या.—विदुरमहाराज, मी आतांच धर्मराजांना सांगितलें, पांडव द्यूत खेळणार नाहींत ! आपणहि धृतराष्ट्राला कळवा, पांडव द्यूत खेळत नाहींत.—मी असा परत जातों आणि धर्मराजांना त्या तेथेंच कोंडून ठेवतों. आपली आणि धर्मराजाची ह्यानंतर गांठच पडूं देत नाहीं.—माझ्याहून निराळें उत्तर धृतराष्ट्राला नाहीं.—निराळें उत्तर द्यायला येऊंच देत नाहीं धर्मराजांना येथें. [ भीम जाता.

**द्रौप०**:—मामंजी, त्यांच्या हातून भलताच अविचार होईल. आपण

जा त्यांच्या मागून; आणि चार विवेकाच्या गोष्टी सांगून त्यांना अगोदर शांत करा.

**विदु०:**—धर्मासन्निध गेल्यावर भीम शांत होईल; त्याची काळजी तूं करूं नकोस. [ विदुर जातो.

**द्रौप०:**—आज जर आम्ही द्यूत खेळायचें नाकारलें, तर श्रीकृष्णाच्या अग्रपूजेचें निमित्त पुढें करून मोठ्या संग्रामाला प्रारंभ होणार; जरासंध आणि शिशुपाल यांचा वध ताजा असतांनाच हें युद्ध सुरू होऊन कृष्णनिंदेची नौबत चोहोंकडे कौरव वाजविणार; आणि श्रीकृष्णाच्या अहंकारामुळें सर्व क्षत्रियांचा नाश झाला, असा दुर्लौकिक कृष्णद्वेष्टे करीत राहणार.—जरासंध आणि शिशुपाल ह्यांचा वध झाला त्याच वेळीं, कंसवधापासून आरंभ झालेल्या श्रीकृष्णचरित्राची समाप्ति झाली ! त्यानंतरहि श्रीकृष्ण जिवंत आहेत; ते पांडवांचे मार्गदर्शक, जगाचे उपदेशक, विश्वाचे गुरु, एवढ्या नात्यापुरतेच जिवंत आहेत. कालपरवां अशा पुण्याईत समाप्त झालेलें तें चरित्र, आम्ही पांडवांनीं गृहकलहाच्या आणि बंधुबंधूंतील मत्सराच्या घाणीनें कां मलिन होऊं द्यावें ? मग पांडव तरी कृष्णचरित्राचे अभिमानी कसचे ?

**पद २७.** [ राग—मांड; ताल—कवाली. **चाल**—‘ वख्ते कुतुहल देखा’ ]

**जगला कशासि चेला, जरि कालिमा गुरूला**
**॥ध्रु०॥ नच नांवलौकिकाला, ना सांप्रदा-**
**यिकाला, संतोष शिष्य झाला; धिःकार हा**
**तयाला ॥ १ ॥**

श्रीकृष्ण निंदेची पर्वा करीत नाहींत हें खरें; पण त्यांचें चरित्र मलिन होऊं द्यायचें नाहीं, हें झालें तरी विश्वकार्यच आहे. पांच पांडवांपुरते श्रीकृष्ण थोडेच आहेत? साम्राज्ञी झालेल्या ह्या एकट्या द्रुपदकन्येकरितां थोडेच श्रीकृष्ण आहेत ? त्यांचें चरित्र श्रीमंत गरीब, गुणी विगुणी, सुदैवी दुर्दैवी, सर्वांकरितां आहे. त्यांचा उपदेश विश्वाकरितां आहे. गुरूची शिकवणूक सर्वांच्या हृदयाला पटावी म्हणून गुरूचें



द्रौ०—लढवूं गुरुला रणीं नका. [पृ. ४५.]

चरित्र निष्कलंक ठेवण्याचा, गुरूंची निंदा होऊं न देण्याचा, गुरूंच्या विरुद्ध वैरीहि ब्र उच्चारीत नाहींत अशी खबरदारी घेण्याचा बोजा पट्टशिष्यांवर पडत नाहीं काय ?—आम्हालाच तेव्हढीं संकटें आहेत, आणि आजच्या आणि पुढच्या गोरगरिबांना संकटें नाहींत, असें कोठें आहे ? ह्या राजकन्येच्या आणि साम्राज्ञीच्या दुःखाची तऱ्हा शेतांत राबणाऱ्या गरीब मुलीच्या दुःखाहून जरा निराळी असली, तरी दुःखें इथून तिथून सर्व सारखींच. मग माझ्याच तेवढ्या दुःखाचा कैवार श्रीकृष्णांनीं घ्यावा, आणि त्या गरीब मुलीच्या दुःखाकडे दुर्लक्ष करावें, असलें पक्षपाती कृष्णचरित्र नाहीं. श्रीकृष्णाची शिकवणूक दरिद्र्याहूनहि शतदरिद्री असलेल्यांच्या झोंपडीजवळ पोहोंचली जर नाहीं, तर अवतार-कार्य विफल होईल. माझ्या गुरूंच्या शिकवणुकींचा तो पवित्र ओघ सर्व गोरगरिबांच्या भेटीला जाण्याला सज्ज होत असतांना, मोठ्या युद्धांत श्रीकृष्णाला अडकवून, वैऱ्यांना श्रीकृष्णाच्याच चरित्रावर अहंकाराचा छाप मारण्याची संधी देऊन, श्रीकृष्णाची अग्रपूजा महायुद्धाला कारणीभूत करून, श्रीकृष्णाच्या विश्वकार्याच्या आड आम्ही पांडव कसे उभे राहूं ?

**पद २८.** [राग–जिल्हा पहाडी; ताल–खेमटा. चाल—'गुरु दीन दयाळ' ]

> **लढवूं गुरुला रणीं नका ॥ ध्रु० ॥ बोधा-**
> **मृतासि पसरावयासि व्हावे कां बांध**
> **नेमका ॥ १ ॥**

त्यांनीं जर द्यूत खेळायचें पसंत केलें, तर त्यांच्या इच्छेविरुद्ध मी एक ब्रहि बोलणार नाहीं. [ शकुनी, दुर्योधन, कर्ण येतात. ]

**शकु०**:—विदुरमहाराज कोठें आहेत ?

**द्रौप०**:—मी त्यांना आतां इतक्यांत येथें पाठवून देतें [ द्रौपदी जाते.

**शकु०**:— कौरवेश्वरा, तुझ्या वैभवाची शुभघटका भरत आली आहे; तूं मात्र कृष्णनिंदा करून ही वेळ हातची दवडूं नकोस. द्यूताला संमति धृतराष्ट्रमहाराजांकडून मीं आणविली आहे; विदुर त्यासाठीं मीं

आणविला आहे; धर्म नाहीं म्हणणार नाहीं; कृष्णाचे मोहोरे इंग्ला आम्हीं पकडल्यामुळें कृष्णभक्तीनें भोळसट बनलेली ही द्रौपदी विरुद्ध जाणार नाहीं; माझ्या हातांत जरासंधाच्या हाडांचे फांसे आहेत; सर्व घाट पाहिजे तसा जुळून आला आहे. वंगराज, पूर्वीं वृत्राला मारण्याकरितां, इंद्राला ज्याप्रमाणें दधीची ऋषीच्या हाडाचें धनुष्य बनवावें लागलें—हाडवैर हाडांच्याच शस्त्रानें वश पावत असतें—मींहि जरासंधाच्या हाडांचें शस्त्र हातीं घेतलें आहे. तेव्हां म्हणतों थोडा वेळ आपल्या बाणांची शेखी थोडी मागें घेऊन, वेळ पडल्यास कृष्णाची स्तुति करून, ही संधि साधा.

**कर्णः**—जरासंधाच्या हाडांच्या शस्त्राचें मला कांहीं महत्व वाटत नाहीं. माझ्या एकट्याच्याच धनुष्यावर विश्वास ठेवून, कौरवेश्वरानें सम्राट्पदाचा अभिलाष धरायला मुळींच हरकत नाहीं. तथापि कौरवेश्वराच्या द्यूताच्या मार्गाला मी प्रतिबंध करूं इच्छित नाहीं. कौरवेश्वराची जी इच्छा, तीच माझी इच्छा.

**शकु०ः**—तशीच वेळ आली, तर आतां कृष्णाची स्तुति कराल ना ?

**कर्णः**—मी कृष्णाची निंदा आजपर्यंत कधींच केली नाहीं, आणि करण्याचेंहि प्रयोजन मला नाहीं. कंस, जरासंध आणि शिशुपाल ह्यांना साहसानें मारणाऱ्याची किंमत ओळखण्याइतकी वीरवृत्ति ह्या कर्णाच्या अंगांत खात्रीनें आहे.

पद २९. [ राग– गौड सारंग, ताल–त्रिवट; चाल—'सैंया परोनहि मोरि पैंया. ]

**नमवितो मम वीरवृत्तिला; प्रिय बहु यादव-**
**साहस मजला ॥ ध्रु० ॥ वीर कृष्ण तो सन्मुख**
**येतां, निजतेजें लववी मानेला ॥ १ ॥ कर्ण**
**आग्रही संगरजेता, परि पूज्यचि समजे**
**कृष्णाला ॥ २ ॥**

**शकु०ः**—सुयोधना, ते पहा—धर्मराज, विदुर, भीम, द्रौपदी इकडेच येत

आहेत. पहिल्या संधीलाच कृष्णाची स्तुति करून घे म्हणजे झालेंच काम फत्ते. [ धर्म, विदुर, भीम, आणि द्रौपदी येतात.

**धर्मः**—

पद ३० [ राग—तिलक कामोद; ताल—झपताल. चाल—'जीआसुख' ]

**औषधाचि मज द्यूत, नसतां कपट त्यांत;**
**संदेह देहांत ठेविना मन शांत ॥ध्रु०॥ निजबां-**
**धव-विलाप, हा रोग, हा शाप; मरण-कण**
**विजयांत पेरितसे कृतांत ॥ १ ॥**

सुयोधना, द्यूत खेळून वैभव पणाला लावून, दैववान कोण हें ठरविण्याची संधि मी तुला दिली असतां, अग्रपूजेचा हक्क सोडण्याला आणि श्रीकृष्णाच्या स्तुतींत सुख मानण्याला तूं तयार आहेस काय ?

**दुर्यो०**:—सम्राटा, मयसभेच्या वैभवाकरितां मला अग्रपूजेचा हक्क पुढें करावासा वाटला; द्यूत खेळून, माझ्या दैवाची परीक्षा जर आपण करूं देत असाल, तर अग्रपूजेचें युद्ध मला कशाला पाहिजे ?

पद ३१ [ राग—तिलंग; ताल—पंजाबी. चाल—' मजसम कोणि नसे ]

**मज बलरामें गदा शिकाविली ॥ ध्रु० ॥ नमन**
**करी मी श्रीकृष्णाला, म्हणूं कसा रिपु गुरु-**
**बंधूला; कौरव हा आपण समजाविला,**
**शमला मम दुराग्रह सुवेळीं ॥ १ ॥**

**शकु०**:—श्रीकृष्णाच्या—त्या अजिंक्य वीराच्या—त्या थोर विभुतीच्या अग्रपूजेचा वाद कौरवांनीं उकरून काढणें, मलाहि पसंत नाहीं. श्रीकृष्णाचा पांडवांइतका कैवारी मी नसलें तरी, लहान सहान कां होईना, श्रीकृष्णाचा मीहि भक्तच आहें. आणि श्रीकृष्णाकडील ह्या ओढ्यामुळेंच ह्या घनघोर युद्धाच्या प्रसंगीं, मला ही द्यूताची तडजोड सुचली. धृतराष्ट्रमहाराजांना जशी ती पसंत पडली; तशी आपणालाहि या शकुनीची तडजोड— [ भीम येतो. ]

**भीमः**—शकुनीची तडजोड ! कपटाचीच तडजोड. पांडवांना भिक्षेला

लावण्याची तडजोड आम्हीं वीरांनीं स्वीकारायची म्हणजे लक्ष्मी वीरांना वाहिलेली नसते, असें कबूल करणें होय.

**द्रौप०:**—महाराज, आपल्या शौर्याबद्दलचा हा वाद आहे काय? सर्व विश्वांतली लक्ष्मी आपली बटीक आहे; कोण शंका घेणार? पण पांडवांचें सम्राट्पद जिंकण्याचा प्रारंभ कंसवधापासूनच श्रीकृष्णांनीं केलेला आहे. जरासंधाच्या वधाच्या वेळीं, श्रीकृष्ण आपले गुरु म्हणून आपल्या जवळ उभे होते ना! त्या गुरूचा स्तुतिपाठ वैऱ्यांनाहि आपण करायला लावला;—वरपांगी कां असेना—तेवढा जरी करायला लावलात, तरी गुरुदक्षणा दिल्यासारखें नाहीं का होणार? गुरुदक्षणेची फेड पुरती केल्याशिवाय साम्राज्यलक्ष्मी उपभोगायला आपण लायक कसे ठराल?

पद ३२. [ राग—मालकंस; ताल—झपताल. चाल—' दीम तन देरेना ']

**वीरवर एकला; रणांत विजय कसा आला**
**॥ ध्रु० ॥ तळमळ कृष्णाला; समरीं जवळि**
**राहिला; अनुचर-देहीं सखा संचारला ॥१॥**

श्रीकृष्णाच्या अग्रपूजेचा वाद मिटत असेल, तर शकुनीच्याहि कपटी तडजोडीला रुकार देण्याला आपणाला कमीपणा कोणचा?

**भीम:**—पांचाली, तुला आणि धर्मराजाला, हे दारिद्र्याचे डोहाळे सुचत आहेत.—श्रीकृष्णाच्या अग्रपूजेचाच संबंध येतो म्हणून माझा नाइलाज आहे.—दुर्योधना, ह्या धर्मराजाचा हात धरून दारिद्र्याच्या खड्यांत पडण्याला मी तयार आहें; पण तुला बजावून ठेवतों, हेंहि दिवस निघून गेल्यावर, कौरवांच्या रक्तानें ह्या भीमाचा देह माखून, सर्व वीरांनीं वीरशिरोमणि म्हणून माझी पूजा रणांगणावर बांधलेली पांचालीला दाखविल्याशिवाय, हा भीम स्वस्थ बसणार नाहीं.—पांचाली, भीमाची शक्ति विश्वकार्याचें मूळ आहे; आणि आज जितकें तुला श्रीकृष्णाच्या अग्रपूजेचें महत्त्व वाटत आहे, तितकेंच महत्त्व माझ्या शक्तीच्या पूजेचेंहि उद्यां वाटल्यावांचून राहणार नाहीं. द्या द्या, दादा, द्यूताला संमति



भीम—शकुनीची तडजोड ! कपटाचीच तडजोड. [पृ. ४७.]

द्या. विश्वाची ही शक्ति त्या संमतीच्या आडवी जरी जात नाहीं, तरी पाठमोरी होते आहे. [ भीम जातो.

**धर्मः**—विदुरमहाराज, धृतराष्ट्रमहाराजांना कळवा, मी द्यूताला तयार आहें. मला फांशांचें व्यसन असल्यामुळें श्रीकृष्णाला माझें करणें कसें आवडेल, एव्हढीच मला इतका वेळ शंका होती. श्रीकृष्णाला कोणतें आवडतें आणि कोणतें नाहीं, ह्याचा पडताळा पांचालीकडे पाहून मी नेहमीं घेत असतों. पांचालीची ना नाहीं, मलाहि धृतराष्ट्रमहाराजांचा शब्द मोडवत नाहीं, तेव्हां श्रीकृष्णाची संमति आहेच असें धरून मी चालतों.—कौरवेश्वरा, हस्तिनापुरांत द्यूताची तयारी करा, मी तुमच्या पाठोपाठ हस्तिनापुराला आलोंच म्हणून समजा.—विदुरमहाराज, मला आतां भीमार्जुनांचें शांतवन करायला जाऊं द्या. [ धर्मराज जातात.

**शकु०**:—आम्ही हस्तिनापुरांत जाऊन, द्यूताची तयारी करतों. [ शकुनी, कर्ण, दुर्योधन जातात.

**द्रौप०**:—मामंजी, श्रीकृष्णासारख्या गुरूच्या शिकवणुकीचा फैलाव करण्याचें आपलें काम सुलभ व्हावें म्हणून, पांडवांनीं दारिद्र्याच्या डोहांत ही उडी जाणूनबुजून घेतली आहे. आमच्या ह्या दारिद्र्याची बातमी श्रीकृष्णाला आपण ज्या वेळीं कळवाल, त्या वेळीं आमचा कैवार अंगांत संचारल्यामुळें साहस करायला पुन्हां श्रीकृष्ण प्रवृत्त होण्याची भीति आहे! मामंजी, दरिद्री झालेल्या ह्या बहिणीची एव्हढीच विनंति त्या प्रसंगीं आपण श्रीकृष्णाला करा कीं, साहसाचें आपलें चरित्र संपलें आहे, आणि तें चरित्र पुढें चालविण्याकरितां पांडवांनीं दारिद्र्याची दीक्षा घेतलेली असल्यामुळें विश्वाला उपदेश करण्याच्या आपल्या वृत्तीपासून ढळण्याचें कारण ह्यापुढें उरलेलें नाहीं.

पद ३२. [ राग—पूर्या धनाश्री; ताल—खेमटा. चाल—' सद्गुरु रायें ' ]

**साहसकर्म नका करूं आतां, उपदेशें सकलां द्याहो**
**अमृता ॥ ध्रु० ॥ पांडवां देतां आशीर्वादा, भागिनी ही**
**मागे गोविंदा वर, सांग तूं शिष्यासि डावपेंच चार;**
**सफल अवतार ऐसें होतां ॥ १ ॥** [ पडदा पडतो.

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.



[ स्थळ—हस्तिनापूर, द्यूतसभेचा एक भाग. अक्षपाल आणि रूपवती प्रवेश करितात. ]

**अक्ष०:**—कसा आहे ह्या अक्षपालाचा पायगुण? जरासंधाच्या नगरींत होतों, अखेरीस जरासंधाच्या हाडांचे फांसे केले तेव्हां ती नगरी सोडली! इंद्रप्रस्थाला गेलों, पांडवांना द्यूताच्या जाळ्यांत पकडलें, नंतर इंद्रप्रस्थ सोडलें! येथें हस्तिनापुरांत तर राजसभेंतच अक्षवती नगरीचा राजा म्हणून मोठ्या थाटानें राहिलों आहें! ह्या माझ्या फांशांचा पराक्रमच असा—ह्या फांशांचा—ह्या फांशांचा—

**रूप०:**—आतां फांसे आपल्या हातांत कोठें आहेत? शकुनीमहाराजांच्या हातांत फांसे आहेत हो! असे हुडकता काय?

**अक्ष०:**—डाव सुरू झाला असला पाहिजे; एरवीं ह्या हातांना फांशांची आठवण इतकी व्हायचीच नाहीं.—चल द्यूतसभेंत, डाव सुरू झाला असला पाहिजे.—मयसभेसारखीच दुसरी सभा कौरव-पांडवांच्या ह्या द्यूताकरितां धृतराष्ट्रमहाराजांनीं निर्माण केली आहे.—मला तर दुसरी मयसभाच वाटते!

**रूप०:**—शकुनीमहाराज म्हणत होते, मयसभा शीलवतीसारखी आहे, व द्यूतसभा रूप—

**अक्ष०:**—ह्या माझ्या लाडक्या राणीसारखी आहे.—शीलवतीवर तुझा जसा नेहमीं पगडा बसतो, तसाच पगडा ह्या द्यूतसभेचा मयसभेवर बसणार.—कौरव-पांडव, सर्व राजे ह्या सभेंत द्यूताकरितां बसलेले आहेत.

रूप०:—फार अपूर्व शोभा दिसत असेल !

अक्ष०:—तुम्हां दोघींच्या खांद्यावर हात ठेवून मी तुमच्याकडे पहात असतांना तुम्ही दोघीजणी एकदम गालांतल्या गालांत हंसतां त्या वेळीं जशी शोभा दिसते, तसलीच शोभा ह्या द्यूतसभेंत दृष्टीला पडते आहे.—ह्या वेळीं शकुनीच्या हातांत फांसे खुळखुळत असले पाहिजेत ! माझें हृदय कसें आनंदानें भरून आलें आहे.—लाडके, खरें सांगूं तुला, पांडव ह्या वेळीं हरलेच असले पाहिजेत. मुलगा येतो.

मुल०:—बाबा, तुम्ही येथें काय करीत आहांत ? अहो, कौरव--पांडवांचें द्यूत सुरू होऊन पांडव साफ हरले !

अक्ष०:—हरायचेच !—शकुनीनें काय काय जिंकलें ?

मुल०:—प्रथम मयसभा जिंकली,—

अक्ष०:—जरासंधाच्या हाडांचे फांसे आहेत ते ! आणखी काय काय जिंकलें ?

मुल०:—पांडवांचें सर्व वैभव जिंकलें, पांचहि पांडव आणि द्रौपदी ह्यांचे पोषाख आणि जडजवाहीर जिंकलें, पांडवांचें राज्य जिंकलें बाबा !

अक्ष०:—शाबास जरासंधाच्या हाडांनों, पांडवांचें राज्य जिंकून हाडवैर साधलेंत खरें.

मुल०:—बाबा, पांचहि पांडव गुलाम झाले आहेत ! धर्मसंकट पांचहि पांडव धर्मराजांनीं एकदम पणाला लावले, आणि लगेच शकुनीनें जिंकले बाबा ! पांचहि पांडव दास झाले, बाबा, एका क्षणांत दास झाले. शेंवटीं बाबा, द्रौपदीला धर्मराजानें पणाला लावली —

अक्ष०:—मग द्रौपदीला जिंकली किं नाहीं ?

मुल०:—शकुनी हातांत फांसे घेऊन खुळखुळवूं लागला; मी इकडे तिकडे पहातों तों तुम्ही नाहीं.—बाबा, लवकर चला द्यूताकडे.---एव्हांना खेळ संपलाहि असेल.--हे पहा बाबा, पांचहि पांडवांचे जिंकलेले मुकूट तेथें ठेवले आहेत.—त्यांत किं नाहीं बाबा, नकुळसहदेवांचे ते दोन मुकूट फारच सुंदर आहेत.—आपण अक्षवतीला राजे होऊन गेल्यावर आपणाला

मुकूट नकोत का ? नकुळाचा मुकूट तुम्ही घ्या बाबा, आणि सहदेवाचा मला द्या.--मला ते मुकूट फारच आवडतात.

पद ३४. [ राग—धानी; ताल—त्रिवट. चाल—'काननमे'. ]

**लावियला शशि मुकुटाला, मणिमय अमर**
**कला जणु ॥ ध्रु० ॥ शशि मग अस्ताला नच**
**गेला; डाग लोपला ॥ १ ॥**

बाबा, चला लवकर त्या द्यूताकडे, नाहीं तर शकुनी सर्व मुकूट एकटाच लुबाडून घेईल ! [ शीलवती येते.

शील०:—अग रूपवती, लवकर चल माझ्याबरोबर. भानुमतीबाई-साहेबांनीं द्रौपदीचे दागिने, शालू, चोळी, सर्व कांहीं तूं आणि मीं वांटून घ्यावें, असें सांगितलें आहे.

अक्ष०:—अशी मोठी लूट आहे काय आज ? जा तुम्हीं दोघीजणी द्रौपदीला लुटायला; मी आणि मुलगा जातों पांडवांचे मुकूट लांबवायला.—आम्ही राजासारखे आणि तुम्ही राण्यासारख्या नटून सजून अक्षवती नगरींत प्रवेश करूं!—माझ्या हातांत फांसे होते तोंपर्यंत मी जुगारी होतों; जरासंधाच्या हाडांचे फांसे शकुनीला दिले, त्या वेळीं माझा जुगारीपणाचा अवतार समाप्त झाला. पण जुगारापायीं बारा वर्षें मीं स्मशानांत काढलीं आहेत; आणि त्या बारा वर्षांत स्मशानांतल्या कावळ्यांची वृत्ति माझ्या अंगांत पुरी बिंबली आहे. स्मशानांतल्या कावळ्यांची नजर जशी पिंडावर असते तशी माझी नजर पणाला लावलेल्या मौल्यवान् जिनसांवर नेहमीं राहणार !

मुल०:—बाबा, पांडवांचे ते मुकूट तेथें ठेवलेले पाहून पांडवांना जिवंतपणीं जरासंध पिंड देतो आहेसें मला वाटलें.—बाबा, त्या पिंडांना जर तुमच्या सारखा कावळा शिवला नाहीं—

अक्ष०:—शकुनी आहेना मोठा कावळा शिवायला !

मुल०:—म्हणून म्हणतों, अगोदर जाऊन त्या पिंडांना आपण शिवूं या.—चला लवकर कावळ्यासारखे. [मुलगा व अक्षपाल जातात.



भानु०—हीं स्मशानांतलीं भुतें आतां राण्या होणार ! [ पृ. ५३. ]

**रूप०**:—आमच्या वांटणीला द्रौपदीचे वस्त्रालंकार आले म्हणायचे!—बाई, दागिन्यांची आणि वस्त्रांची वांटणी आपण अगोदरच करूया. नाहींतर प्रेतावरचें वस्त्र घ्यायला जसे स्मशानांतले अभद्र भांडतात तशा आम्ही भांडूं लागूं, आणि ह्या राजवाड्यांत भानुमतीबाईसाहेबांसमोर तुमचं आमचं हंसें होईल.

**शील०**:—हो, आतांच वांटणी ठरवूंया; मणिमंगळसूत्र माझें, आणि तिरडी झाकायचें वस्त्र तुझें—

**रूप०**:—मणिमंगळसूत्रांतहि मला वाटणी मिळाली पाहिजे, आणि तिरडीवरलें फडकेंहि बरोबर फाडून घेतलें पाहिजे. मींहि स्मशानांत बारा वर्षें काढलीं आहेत; उगीच नाहीं ! त्या स्मशानाला जे नियम लागू तेच नियम ह्याहि स्मशानाला— [ भानुमती येते.

**भानु०**:—येथें कसल्या ग स्मशानाच्या गोष्टी बोलतां आहांत ! हीं स्मशानांतलीं भुतें आतां राण्या होणार ! दुर्दैव सर्वांचें, दुसरें काय ? अग, कौरव-पांडवांच्या द्यूतांत आमचा जय झाला; सर्व पांडवांचें राज्य आम्हीं जिंकलें; द्रौपदीसकट सर्व पांडवांचे वस्त्रालंकार आम्हीं जिंकिले; पांडव आमचे दास झाले; द्रौपदीलाहि एव्हांना जिंकून दासी केली असेल; मी द्रौपदीला पहायला आलें तों तुमच्या तोंडीं स्मशानांतल्या अभद्र गोष्टी ! मला कि नाहीं तुम्हीं हा मोठा अपशकून केलात !—जा मला तोंड सुद्धां दाखवूं नका.

**शील०**:—लेणी कोठलें का असेना, पांडवांच्या जिवंत प्रेतांवरचें असो, किंवा श्रीकृष्णाच्या आनंदी गोकुळांतलें असो; कोठलें काय ह्याची चौकशी शहाण्यांनीं करूं नये.—द्रौपदीचे अलंकार मी घेऊं ना ?

**रूप०**:—द्रौपदीचे शालू मी नेसूं ना ?

**भानु०**:—माझ्याशीं बोलूं देखील नका. स्मशानांतल्या ह्या हडळी शंभर कौरवांच्या नांदत्या घरीं शकुनी मामंजींनीं कोठून आणल्या, असें मला तुमच्याकडे पाहिलें म्हणजे वाटतें.

शील०:—चला बाई, आपण शकुनी महाराजांकडे जाऊं आणि त्यांचीच आज्ञा घेऊन द्रौपदीला लुटूं.—आम्हाला अभद्र म्हणा, हडळ म्हणा, कांहीं म्हणा; आम्ही बारानं बारा वर्षं स्मशानांत काढलेलीं आहेत; इतरांनीं मुरडलेल्या नाकांची पर्वा आम्ही करीत नसतों.

रूप०:—स्मशानांतल्या कावळ्यांना आणि कारठ्यांना जसें दुःख म्हणजे काय तें माहीत नसतें, तसें खरे जुगारी केव्हांहि हिरमुसलें तोंड करीत नाहींत. शकुनी महाराज कारटे आणि आम्ही कावळे कौरवांचे आप्तइष्ट असतांना, उगीच कां तोंड वांकडें करतां ? [ शीलवती आणि रूपवती जातात.

भानु०:—द्यूतांत जय झाला; पांडवांचें सर्व वैभव आम्हाला मिळालें; साम्राज्ञीचा द्रौपदीचा मुकूट मला मिळाला; मला आनंद व्हायला पाहिजे होता; पण मन अगदीं खिन्न झालें आहे. मनांत वाईटसाईटच विचार एकसारखे येत आहेत. स्मशानांतल्या गोष्टी ऐकूं येत आहेत; स्मशानांतलेच देखावे दिसत आहेत!—मीं त्या हडळींना हाकलून दिलें खरें, पण माझ्या मनाचें त्यांनीं स्मशान केलें तिथें नंदनवन मी कसें उत्पन्न करूं ? हे घुबड घूत्कार करीत आहेत ! ह्या द्यूतामुळें कौरवांचा हा राजवाडा स्मशानासारखा होणार, असें मला काल रात्रीं स्वप्न पडलें. पुन्हां घुबड ओरडत आहे ! मी पांडवांची खरीखुरी वैरीण नव्हे म्हणून माझीच तेव्हढी पाठ ह्या अपशकुनांनीं पुरवली आहे काय ?

पद ३५. [ राग—सोहनी; ताल—त्रिवट चाल—'मधुरानना' ]

**गमली मना, निज सावली भूतावळी ॥ ध्रु० ॥**
**अशुभ नाना नव कल्पना भयचकिता जवळी ॥१॥**

पुन्हां घुबड ! अभद्र कर्कश आवाज कोठें होत आहेत ? चिन्ह ठीक दिसत नाहीं; गांधारी सासुबाईंना हें सर्व वेळींच कळविलें पाहिजे.

[ भानुमती जाते.

## प्रवेश दुसरा.

[ दासीच्या वेषांत द्रौपदी आणि रूपवती प्रवेश करतात. ]

द्रौप०:—रूपवती, हे सर्व वस्त्रालंकार भानुमतीबाईसाहेबांच्याकडे पोंहोचते कर—

रूप०:—मी आणि माझ्या सवतीनें ते वांटून घ्यावेत, अशी शकुनी महाराजांची आज्ञा झाली आहे.

द्रौप०:—तसें कर.—त्यांची मालकीण मी आतां थोडीच आहे ? दासीचें टाचणें एक वस्त्र, एवढ्याचीच मी आतां मालकीण आहें. विदुरमामंजींनीं पाठविलें म्हणून सांगून हें वस्त्र तुझ्याबरोबर कपटी शकुनीनें पाठविलें असलें पाहिजे.

रूप०:—विदुर महाराजांनीं तसें सांगितलें इतकेंच नव्हे, तर त्यांच्याच मालकीच्या वस्त्रांतून हें वस्त्र आणलें आहे.

द्रौप०:—विदुरमामंजींना माझी एव्हढी तरी लाज राखावीशी वाटली.—पूर्वपुण्याईच उभी राहिली ! साम्राज्ञीच्या शालूहून हें मला अधिक प्रिय आहे. पांचहि पांडव राज्य आणि वैभव गमावून द्यूतांत दास झाले; स्त्रीजातीची लाज रक्षण करण्याहून आधिक मोठें वस्त्र मला काय करायचें ! विदुरमामंजींनीं शतदरिद्री झालेल्या ह्या सुनेच्या अंगावर हें पांघरूणच घातलें ! भानुमतीबाईसाहेबांना सांग, द्यूतांत हरलेले सर्व वस्त्रालंकार उतरून ठेवून, हें वस्त्र नेसून, नेसून म्हणण्यापेक्षां एक वस्त्रानें कसेंबसें अंग झांकून, द्रौपदी कौरवांच्या राजवाड्यांतून बाहेर पडली; आणि आश्रयाकरितां विदुरमहाराजांच्या शिबिराकडे निघून गेली.

रूप०:—बरें राणीसाहेब, असेंच सांगतें. [ जाते.

द्रौप०:—हें टाचणें वस्त्र—दारिद्र्याचें हें चिन्ह—माझ्या दीन स्थितीची ही निशाणी—रस्त्यांतले लोक माझ्याकडे ह्या स्थितींत पाहतील म्हणून आतां कसली शरम बाळगायची !—ते तसे दास होऊन पुरुषांच्या इहलोकच्या नरकांत—गुलामगिरींत—सांपडले असतांना—माझ्या हालअपेष्टांची

त्यांच्या त्या तशा स्थितीपुढें काय प्रतिष्ठा ?–ते दास झाले, मी स्वतंत्र राहिलें !—श्रीकृष्णानीं मला स्वतंत्र ठेवलें—कशाकरितां स्वतंत्र ठेवलें ? शत्रूनें कपटानें त्यांना दास्याच्या खड्यांत लोटून दिलें,–त्यांना दास्यांतून मी जर सोडविलें नाहीं, तर श्रीकृष्णाचा कैवार मी व्यर्थ घेतला असें होईल. ते दास झाले !–धर्मराज, राज्य आणि वैभव पणाला लावल्यानंतर स्वतःला आणि सर्व बंधूंना कां हो पणाला लाविलें ? हें दास्य पतकरण्याची काय जरूरी होती ?—आमचें सम्राट्पद कौरवांच्या डोळ्यांत खुपत होतें; आमची मयसभा दुर्योधनाला पाहवत नव्हती; माझें वैभव पाहून कुरूंच्या स्त्रिया उसासे टाकीत होत्या,—फांशानें दारिद्र्य गळ्यांत बांधलें तेथेंच ही भाऊबंदकी–धर्मराज, आपण संपवायची होती! पांचहि पांडवांना पणाला लावून, फांशानें गमावलेलं फांशाच्याच जोरावर पुन्हां कमवण्याची दैवाची परीक्षा, आपण कशाला पाहिलीत ?—बायकांना जसें कुंकू, तसें पुरुषांना स्वातंत्र्य आहे; तें गमावून तुम्ही दास कां हो झालांत ?

पद ३६.—[ राग–जोगिया; ताल–दीपचंदी. चाल—' रामहरीका भेद न पायो' ]

**कैसा घेतला घातुक बोजा, शौर्या विसरु-**
**नियां सेवावा दुजा ॥ ध्रु० ॥ कौरवराजा**
**कौरवकाजा जुंपवितो आजि पांडव–तेजा ॥ १ ॥**

त्यांना दास्यांतून सोडविल्याशिवाय मीं दुसरें तिसरें ह्या वेळीं कांहींहि करतां कामा नये.—अशी जाऊन धृतराष्ट्रमामंजींना विचारूं का, कोणती किंमत घेऊन पांच पांडवांना दास्यांतून सोडाल,कोणता मोबदला घेऊन पांच पांडवांना शस्त्रास्त्रें पुन्हां परत द्याल ?—स्वतंत्र आणि सशस्त्र झालेले पांडव पुन्हां पराक्रम गाजवून नवें वैभव संपादन करतील.—विदुरमामंजीचें दर्शन प्रथम घ्यावें आणि नंतर धृतराष्ट्रमामंजींकडे जावें. [ **शीलवती येते.**

**शील०**:—द्रौपदी, अग द्रौपदी, शकुनीमहाराजांनीं तुला आज्ञा केली आहे—

**द्रौप०**:—मला आज्ञा !·आणि शकुनीनें काय म्हणून ?

शील०:—काय म्हणून ? तूं कौरवांची दासी झाली आहेस. पांचहि पांडव दास झाल्यानंतर धर्मराजानें तुला पणाला लावली, आणि कौरवांनीं तुला जिंकिली आहे.—कौरवांची दासी म्हणून तुला शकुनीमहाराजांनीं राजसभेंत येण्याची आज्ञा केली आहे. तूं कौरवांची दासी आहेस—

द्रौप०:—द्रौपदी कौरवांची दासी ! मी दासी ! मी स्वतंत्र आहें.—शकुनीला म्हणावें द्रौपदी राजसभेंत येत नाहीं.

शील०:—द्यूतांत तूं दासी झाली आहेस.

द्रौप०:—दास झालेल्या पांडवांना मला पणाला लावण्याचा अधिकार नाहीं.—स्वतः दास होण्यापूर्वी जर मला पणाला लावली असती तर गोष्ट निराळी होती; मी दासी झालेली नाहीं.—मी स्वतंत्र आहें.—ही द्रौपदी राजसभेंत येईल, ती दासी म्हणून येणार नाहीं, तर पांडवांना दास्यांतून सोडविणारी त्यांची स्वतंत्र असलेली अर्धी पुण्याई म्हणून राजसभेंत लवकरच येईल; असें शकुनीला बजावून सांग. [ शीलवती जाते. स्वतः दास झाल्यावर मलाहि त्यांनीं पणाला लावलें ! धर्मराज, आपला विवेक ह्या वेळीं कोठें हो गेला ?—फांशांत परमेश्वर संचार करीत नसतो, तर पुण्याईच्या पराक्रमांत संचार करीत असतो; हें आपल्या विवेकी बुद्धीला ह्या वेळीं कसें हो समजलें नाहीं ? स्वतः दास झाल्यावर बायकोला पणाला लावण्याला आपणाला अधिकार कोठचा होता ?—बरें झालें;ही चूक त्यांच्या हातून झाली हें बरें झालें.—मलाच जर प्रथम पणाला लाविली असती तर पांडवांची ही अर्धी पुण्याई स्वतंत्र राहिली नसती.—पुरुषांनीं स्वतः पाहिजे तर बिघडावें; पण आपल्या अगोदर बायकांना कधींहि बिघडवूं नये; कारण पतित झालेल्या पुरुषांचा उद्धार बायका करूं शकतात !

पद ३७. [राग—ललत; ताल—धीमा तिताला. चाल—'रेनकासपना' ]

नेमिली अबला—काया पतित उद्धाराया
॥ ध्रु० ॥ मारित पातक, आला थकवा;
विसावा देवा कुलक्रिया ॥ १ ॥

विदुरमहाराजांचें दर्शन प्रथम घ्यावें; आणि दास्यांतून सोडविण्याची प्रतिसेवा कशी करावी, हें त्यांनाच विचारावें. [ दुःशासन येतो.

दुःशा०:—ए बटीक, कोठें चाललीस ? मागें फीर.—द्यूतांत कौरवांनीं तुला जिंकलें आहे, आणि राजसभेंत तुला घेऊन जाण्याकरितां मी आलों आहें.—बऱ्या बोलानें माझा हात धरून चल, नाहीं तर—

द्रौप०:—मी दासी नाहीं, मी स्वतंत्र आहें. पांडव दास झाल्यावर मला पणाला लावलेली असल्यामुळें मला दास्य आलेलें नाहीं.

दुःशा०:—तुला दास्य आलें आहे. द्रौपदी आमची बटीक झाली, हें सर्वांना समजावें म्हणून भरसभेंत पांडवांच्या देखत दासीचीं कामें तुला मी करायला लावणार आहें. द्रौपदी, तूं आतां निमुटपणें माझ्याबरोबर राजसभेंत आली पाहिजेस; आणि कौरवेश्वर आज्ञा करील त्याप्रमाणें दासीचीं कामें पांडवांच्या देखत तूं केलीं पाहिजेस. तसें जर न करशील तर—

द्रौप०:—चांडाळा, तूं काय करणार !

दुःशा०:—जबरदस्तीनें भर राजसभेंत पांडवांच्या देखत तुला कोणातरी कौरवाच्या मांडीवर बसवून तुझ्या दासीपणाच्या ह्या दुसऱ्या लग्नाचा समारंभ मी उरकून घेणार.

द्रौप०:—नीचा, मी दासी झालें असलें तरी असले अभद्र शब्द तुला उच्चारण्याचा अधिकार नाहीं.—द्यूतांत जिंकलेली दासी म्हणजे वारांगना नव्हे.—ही द्रौपदी स्वतंत्र आहे; पंडूची सून आहे; धृतराष्ट्रमहाराजांची सून आहे; अजिंक्य भीष्माची सून आहे. स्वतंत्र असलेली ही द्रुपदकन्या, दुःशासना, तुला बजावून सांगते, भावजयीची अशी विडंबना करून शंभर कौरवांचा नाश करून घेऊं नकोस.

पद ३८. [राग—सोहनी; ताल—त्रिवट. चाल—'येरी जसोदा तोसे' ]

**तो कृतांत तुज करि सुचनेला, मार्ग जातसे**
**हा नरकाला ॥ ध्रु० ॥ सकल समय रिपुसम**



दुःशा०—जनावराप्रमाणें फरफटत ओढीत नेतो. [ पृ. ५९ ]

टपला यम, जवाळि जवाळि निरखित सकलाला;
स्त्री-सद्गुण-गण झगडत क्षण क्षण, लाज
समज मम कवच कुळाला ॥ १ ॥

जा, मी येत नाहीं; कौरवांचा माझ्यावर काडीचाहि हक्क नाहीं.

दुःशा०:—हक्क नाहीं कसा ? जिंकली आहे तुला; तूं आमची दासी आहेस. चल मुकाट्यानें,—जनावराप्रमाणें फरफटत ओढीत नेतों—बोलाव भीमाला बोलाव, अर्जुनाला बोलाव, नाहीं तर कृष्णाला बोलाव,—फारच आढेवेढे घेतलेस, तर पायाला दोरी बांधीन आणि मेलेल्या कुत्रीप्रमाणें ओढीत नेईन,—चल मुकाट्यानें चल,—आनंदानें चल—हंसऱ्या चेहऱ्यानें चल—दासींना पाहिजे तितके नवरे करण्याचा अधिकार असतो—पांडवांच्या देखत पाहिजे तो कौरव तूं पसंत कर—चल, ए बटीक, नाचत नाचत चल, तुझ्या ह्या नव्या स्वयंवराकरितां राजसभेंत चल,—

द्रौप०:—कृष्णा, ह्या भगिनीचा अंत अजून किती वेळ घेणार ! ( ओढीत नेली जात असतांना सोडवून घेऊन )—जा, मी येत नाहीं; मी स्वतंत्र आहें, मी स्वतंत्र आहें— [ निघून जाते.

दुःशा०:—कोठें पळून जातीस ? पाताळांत लपून बसलीस तरी तेथून तुला ओढून आणून भरसभेंत कौरवेश्वराच्या मांडीवर बसवितों.—गांधारीकडे पळून चाललीस काय ?—गांधारीच्या किंवा भानुमतीच्या आड जरी उभी राहिलीस, सर्व कौरव-स्त्रियांचे पाय जरी धरून बसलीस—आई असो, भावजय असो, किंवा बायको असो; सर्वांना दूर लोटून त्यांच्या देखत तुझा पदर ओढून तुला राजसभेंत खेंचून नेतों. [ जातो.

## प्रवेश तिसरा.



[ सिंहासनावर धृतराष्ट्र; दोनहि बाजूंला भीष्म, द्रोण, विदुर, वगैरे; सिंहासनापुढें पट मांडला आहे; पटापुढें पांडवांचें मुकूट, अलंकार आणि शस्त्रें ठेविलीं आहेत; एका बाजूला दासाचे वेषांत पांच पांडव आणि पटाच्या दुसऱ्या बाजूला शकुनी, दुर्योधन, कर्ण वगैरे; असा देखावा. **पडद्यांत**—" चल, ए बटीक, नाचत नाचत चल; मेलेल्या कुत्रीप्रमाणें ओढीत नेतों; चल मुकाट्यानें." ]

**दुर्यो०:**—कर्णा, ओढीत आणिली द्रौपदीला दुःशासनानें !

[ पडद्यांत पूर्वोक्त. द्रौपदीला ओढीत दुःशासन येतो.

**दुःशा०:**—दादा, ही तुमची बटीक तुमच्या पुढें उभी केली आहे.

**द्रौप०:**—श्रीकृष्णा, माझा अंत कितीरे पाहणार ?

**पद** ३९. [ राग-मांड; ताल-दादरा. चाल-'उड चल हंसा' ]

**लवकरि कृष्णा पतितपावना, खलमन शांत**
**कराना ॥ ध्रु० ॥ उन्मत्त खल माजला,**
**करुणा देवा तुला; तव कर न धरि चक्र, परि**
**हृदया द्रव आला; दुःखित बहु भक्तांनीं**
**जागता देव केला; खलमन-बुद्धि पालटे,**
**चमत्कार ह्याचि जना ॥ १ ॥**

मी दासी नाहीं, मी स्वतंत्र आहें; आणि नीचा, मला अशा स्थितींत जबरदस्तीनें येथें आणण्याचा अधिकार तुला नाहीं.

**दुर्यो०:**—तुला आम्हीं द्यूतांत जिंकलें आहे,—धर्मानें तुला पणाला लाविली, आम्हीं जिंकली—

**द्रौप०:**—ते दास झाल्यावर त्यांनीं पणाला मला लाविलें—

दुर्यो०:—हो, दास झाल्यावर हें खरें; धर्म दास झाला खरा, पण तुझें आणि त्याचें नवराबायकोचें नातें कांहीं नाहिसें झालेलें नव्हतें, आणि त्या नात्यानें त्यानें तुला पणाला लाविली—

द्रौप०:—दास झाल्यावर नवराबायकोचें नातें नाहींसें होत नाहीं, हें तुम्हांला मान्य आहे ना ?—मग माझ्या अब्रूचे असे धिंडवडे कां ?—धृतराष्ट्रमहाराज, आपली ही सून—सून मला म्हणायला आपण तयार नसाल—ही एक गरीब अबला—आपले दास झालेल्यांची ही धर्मपत्नी—एकवस्त्रानिशीं लाजिरवाण्या स्थितींत—पदर ओढीत—फरफटत—मेलेल्या जनावराला पाय ओढून टाकून द्यावें त्याप्रमाणें—वारांगना समजून बेशरम कुशब्दांनीं ताडीत—येथें कोणत्या न्यायानें आणलीत ? कौरवांच्या ह्या सिंहासनाला माझा प्रश्न आहे, विदुर, भीष्म, द्रोण ह्यांच्या सारख्या वयोवृद्धांना आणि तपोवृद्धांना माझा प्रश्न आहे, दास झाले तरी नवराबायकोचें नातें विलयाला जात नाहीं म्हणून कबुली देणाऱ्या दुःशासन-दुर्योधनांना माझा प्रश्न आहे, स्त्रीजातीला लाज आणणारी ही माझी विटंबना तुम्ही कां हो करीत आहांत ? मी दासी झालें किंवा नाहीं झालें, हा वाद एका बाजूला ठेवा; अशा लाजिरवाण्या स्थितींत दासीला देखील कुरूंच्या सिंहासनापुढें फरफटत कां ओढण्यांत यावें ? स्त्रीपणाच्या लाजेची मर्यादा—स्त्रीपणा म्हणजे नुसता उपभोगण्याचाच विषय नसतो,—मातेचा स्त्रीपणा—बहिणीचा स्त्रीपणा—कन्येचा स्त्रीपणा—सर्व स्त्रीपणा सारखाच;—त्या स्त्रीपणाच्या लाजेची मर्यादा ह्या राजसभेनें मानायची नाहीं तर कोणी मानायची ? आई, बहीण, मुलगी, धर्मपत्नी ह्यांच्या स्त्रीपणाची ओळखच नाहीं; आणि बाजारबसवीच्या स्त्रीपणाची तेव्हढी माहिती आहे, इतकें नादान भीष्मांनीं वाढविलेलें हें कुरूंचें कूळ कधीं झालें ? धृतराष्ट्रमहाराज, आपल्या मातोश्रीचा आणि आपल्या आजीचा—सत्यवतीचा—जो स्त्रीपणा तोच ह्या द्रौपदीचा स्त्रीपणा; सुयोधनमहाराज, गांधारी सासुबाईचा जो स्त्रीपणा तोच ह्या द्रौपदीचा स्त्रीपणा; ह्या राजसभेंतील सर्व पुरुषांनों, तुम्हां सर्वांच्या मातांचा जो स्त्रीपणा तोच माझा

स्त्रीपणा; त्या स्त्रीपणाला ह्या लाजिरवाण्या स्थितींतून सुटून जाण्याची परवानगी द्या.

पद ४०. [ राग–देशी; ताल–धीमा तिताला. चाल—'म्हारेडेरेआवो' ]

तो दिन आठवा, ज्या दिनिं आपला चिमु-
कला जीव जन्मला नवा ॥ ध्रु० ॥ पुरुष–
जात विसरली मातेला; तनुवरि उमटला डाग
तोचि घालवा ॥ १ ॥

स्त्रीपणाची महती सर्व विश्वभर गात सुटणारें हें कुरूंचे कूळ ! शंतनूनें गंगेच्या लहरींची आराधना काय थोडी केली ! ह्या पितामह भीष्मानें सावत्रआईची मनधरणी काय थोडी केली ! स्त्रियांच्या अंकित असलेलें हें सिंहासन आहे, अशी आपली दिगंती कीर्ति ! आणि धृतराष्ट्रमहाराज, ह्याच सिंहासनासमोर द्रुपदराजकन्येच्या अब्रूचे हे धिंडवडे !

**विदु०:**—राजा, द्रौपदीच्या ह्या लाजिरवाण्या स्थितीनें सर्व कुरूंच्या कुळाला काळिमा लागत आहे. हिला जबरदस्तीनें राजसभेंत उभी करणें हा अधर्म आहे. राजा, येथून जाण्याची परवानगी हिला आपण ह्या वेळीं दिली पाहिजे.

**धृत०:**—सुयोधना, जबरदस्तीनें लाजिरवाण्या स्थितींत हिला कां आणली ? माझ्या कुळाचा दुर्लौकिक मी तुम्हाला करूं देणार नाहीं. स्त्रीपणाची योग्य मर्यादा कौरवांच्या राजसभेंत राखली जात नाहीं, असा काळिमा माझ्या सिंहासनाला लागतां कामा नये.—सुयोधना, द्रौपदीला लाजिरवाण्या स्थितींत जबरदस्तीनें राजसभेंत कां आणलीस ?

**दुर्यो०:**—बाबा, द्यूतांत हिला जिंकली असतांना दासी आहे असें ही कबूल करीना, म्हणून हिला ह्या लाजिरवाण्या स्थितींत जबरदस्तीनें आणावें लागलें. बाबा, पांडवांशीं मी द्यूत खेळून त्यांचें सम्राट्पद आणि वैभव हरण केलें तें त्यांना दास्यांत निरंतर ठेवण्यांत मला आनंद वाटतो म्हणून मीं केलें, असें कां आपणाला वाटतें ? विदुरमहाराज, द्रौपदीचा

पदर ओढून खेचून आणावी लागली, तें कामांध पुरुषांच्या पशुवृत्तीमुळें आम्हीं केलें, असें कसें म्हणतां ? "नादान, कमकुवत, अंधपुत्र" म्हणून हा भीम, ही द्रौपदी आम्हाला हंसली; दुर्दैवी म्हणून ह्यांना आम्ही कां हंसूं नये ?

पद ४१. [ राग—बहार; ताल—त्रिवट; चाल—'हजरत ख्वासंग' ]

**तृणसम कुरुवर मानियला, समजुनि उम-**
**जुनि दुखविला ॥ ध्रु० ॥ कां न तोंचि**
**आजि परतुनि घ्यावें, द्यावें भरपूर माप**
**उलट हिला ॥ १ ॥**

रूपगर्वित द्रौपदीला वाटत असेल कामांध होऊन आम्ही जबरदस्ती करीत आहों; पण बाबा, तशी स्थिति नाहीं.—ही दासी झाली आहे; आणि दासीपणानें पाहिजे त्याला पाहिजे तितका वेळ पति मानण्याची सवलत हिला मिळाली आहे; पण बाबा, दासी म्हणून हिनें आपखुषीनें जरी आपलें सौंदर्य आम्हाला अर्पण केलें, तरी तुच्छतेनें हंसण्यापलीकडे हिच्या सौंदर्याकडे आमची नजर वळणार नाहीं.—मयसभेंत पाहिजे तसें हंसली, मी कां आज हंसूं नये ?

**कर्णः**—ही रूपगर्वित द्रौपदी स्वयंवराच्या वेळीं पाहिजे त्याला पाहिजे तसें टाकून बोलली.—ह्या राजसभेंतल्या वयोवृद्धांना आणि तपोवृद्धांना माझा प्रश्न आहे, धनुर्विद्येंत स्वतःला अजिंक्य समजणाऱ्या ह्या कर्णाला ह्या द्रौपदीनें तसें टाकून बोलल्यानंतर, दासी म्हणून कौरवेश्वरानें हिला माझ्या स्वाधीन केली तरी घरचें केरपोतेरें घालायला लावण्यापलीकडे हिच्या सौंदर्याला मी काडीचाहि मान देणार नाहीं, असें कर्णानें ह्या द्रौपदीला कां ऐकवूं नये ? आमच्या अपमानाचा सूड अशा रीतीनें उगविण्यांत गैरशिस्त काय आहे ?

पद ४२. [ राग—खमाज. ताल—त्रिवट. चाल—'ही विषमतम मम'

**मी मानधन अवमानितों सुंदरा; " नच**
**लग्ना अनुकूल वर " गर्वित वचन अपमान**

**नरा ॥ ध्रु० ॥ स्वयंवरसमय तसा शल्य-**
**सम झाला; मरण समजा मनाला; सविष--**
**सर्प--समाचि डवचिला कर्ण खरा ॥ १ ॥**

दुःशा०:—मयसभेंत माझ्या हातांत गदा नसतांना ह्या भीमानें मला उचलून खदखद हंसून मला पाण्यांत टाकलें; मीं हिचा हात धरून हिला ओढून आणली, कोणचें गैर झालें ?

विदु०:—लोभानें आणि कपटानें पांडवांचें सर्व लुबाडून घेऊन पुन्हां दासीपणाचे सर्व अपमान सोसायला लावून दुःखावर डागण्या कां देतां ?

दुर्यो०:—आम्हीं लोभानें लुबाडलें ! आम्हीं कपटानें लुबाडलें ?—हा सुयोधन पांडवांच्या एका कपर्दिकेलाहि शीवूं इच्छित नाहीं.—मी मानाचा हापापलेला, पैशाचा नाहीं.—भीष्म--द्रोणांना मी विचारतों, आपल्या-सारखे अतिरथी ज्या सिंहासनाचे आधार--स्तंभ आहेत, त्या सिंहास-नापुढें सर्व राजांनीं मांडलीक म्हणून माना लववाव्या अशी महत्त्वाकांक्षा मी कां धरूं नये ? द्यूतांत फांसा अनुकूल पडावा, ह्याहून अधिक मोठ्या किंमतीचा पराक्रम पांडवांनीं तरी राजसूय यज्ञ करण्यांत कोणचा केला ? नारदानें सुचविलें, कृष्णानें जरासंधाला कपटानें मारण्याची संधि साधली, युधिष्ठिर सार्वभौम झाला !—शकुनी मामांच्या हातांतल्या फां-शांच्या खुळखुळाटाहून अधिक पराक्रमाचीं हीं कृत्यें नाहींत.— नारदानें आणि कृष्णानें ह्यांना अगोदर सुचविलें—

द्रौप०:—जेथें पूर्वपुण्याई मोठी असते, तेथेंच सद्विचारांची हाल-चाल महर्षि करीत असतात.

दुर्यो०:—ही दिसते आहे पांडवांची मूर्तिमंत मोठी पुण्याई !—ह्या मुकुटांकडे, ह्या शस्त्रास्त्रांकडे, ह्या वस्त्रालंकारांकडे प्रथम पहा आणि द्रौपदी, मग पुण्याईच्या बढाया मार.—दासदासींनींहि मालकांच्या पुढें पुण्याईची शेखी मिरवावी म्हणजे उर्मटपणाचा कळस होय ?—विदुर—

महाराज, ही अशी बेपर्वा, अशी उमेट, अशी निर्लज्ज—हिच्या लाजिरवाण्या स्थितीची कींव करायला आम्हांला सांगता हं !

द्रौप०:—माझी कींव करायला श्रीकृष्ण समर्थ आहे; आपण कींव करूं नये; आणि आपली कींव माझ्या उपयोगींहि पडणार नाहीं.— मीं राजसभेला कींव करायला सांगितलें नाहीं; राजसभेनें स्वधर्म पाळावा म्हणून सांगितलें; आणि तें स्वतःच्या पुण्याईच्या जोरावर सांगितलें. माझी पुण्याई मोठी म्हणून श्रीकृष्ण माझा पाठिराखा, माझा सखा, माझा गुरू—ही भक्तीची ज्योत माझ्या अन्तःकरणांत सदा पेटलेली आहे; समजलास दुर्योधना.—श्रीकृष्णाचें साहसाचें अवतारकार्य संपलें आहे; स्वतः त्यांनीं जें केलें तें ते शिष्यांकडून करवणार आहेत. केलें—करवलें—आणि मग सांगितलें, ह्या तीन पाहिरींतील दुसऱ्या पाहिरीची सेवा घडावी म्हणून पांडवांचे मुकुट आणि शस्त्रास्त्रें त्या पाहिरीवर आज दिसत आहेत.—श्रीकृष्णाचा जन्म बंदिवासांत झाला; पांडवांकडून श्रीकृष्णासारख्या होणाऱ्या पराक्रमाचा जन्महि आज दास्यांत झाला आहे !—कृष्णजन्मानें कंसाला जी भीति वाटली, तीच भीति ह्या सिंहासनाला आज वाटली पाहिजे.—गोकुळांतल्या स्वतंत्रपणानें वागणाऱ्या गोपींनीं श्रीकृष्णाचें संगोपन बाल्यावस्थेंत जें केलें, पांडवांच्या नव्या दिव्य पराक्रमाचें तेंच संगोपन ह्या राधेच्या हातून व्हावें म्हणून द्रौपदी दासी झालेली नाहीं, स्वतंत्र आहे.—ही पुण्याई काय लहानसहान आहे ?—पांडवांच्या पराक्रमाला गोकुळांत—स्वतंत्र हवापाण्याच्या रानांवनांत—नेण्याकरितां ह्या कैदखान्यांतहि ही द्रौपदी ह्या क्षणीं खटपट करीत आहे !—ही पुण्याई कोणाला अभिमानी करणार नाहीं ?

पद ४३. [ राग—भैरवी; ताल—कवाली. चाल—" मन मगन भया "]

मज भय न, असा शिरला वारा ॥ ध्रु० ॥
देवाजीचें काज खरोखर मी करीन, हा
माझा तोरा ॥ १ ॥ असतांना नव संचार
मनीं, कोण पुसे तुमच्या जोरा ॥ २ ॥

धृतराष्ट्रमहाराज, ह्या लाजिरवाण्या स्थितींचीं दुःखें माझीं, मीं एकटीनेंच सोसलीं पाहिजेत, आणि तीं मी निमूटपणें सोसतें आहें.— राजसभेचा स्वधर्म म्हणून आपणाला काय करायचें असेल तें करा.— हीं दुःखें सोशीत असतांना आपल्या ह्या सुनेची विनंति आपणाला अशी आहे, कोणची किंमत घेऊन ह्या दासांना दास्यांतून सोडण्याला आपण तयार आहां, तें मला सांगा. म्हणजे त्याच कोमाल्या ह्या देहाच्या, ह्या मनाच्या, ह्या पुण्याईच्या सर्व शक्ति ह्या क्षणापासून अर्पण करण्याला आपल्या ह्या सुनेला ठीक पडेल.

**दुर्यो०:**—उर्मटे, मी सांगतों तुला कोणती किंमत घेऊन पांडवांना दास्यांतून सोडायला मी तयार आहें तें.—तुला गोकुळासारख्या रानावनांत नवीन पराक्रमाची जोपासना करण्याची हौस आहे नव्हे ?—बाबा, मी ज्या अटी आतां द्रौपदीला सांगणार आहें, त्या आपण ऐकल्या, म्हणजे कपटी लोभामुळें आम्हीं द्यूत खेळायला पांडवांना बोलावलें ही विदुराची निंदा जगांत कोणीहि ऐकून घेणार नाहीं.

**धृत०:**—बाळ, कुरूंनीं केव्हांहि कंजूष, लोभी आणि कपटी ठरूं नये, अशी माझी इच्छा आहे.

**दुर्यो०:**—बाबा, मी जर लोभी आणि कपटी असतों तर ह्या दाता म्हणून नांवाजलेल्या मोकळ्या मनाच्या कर्णाचा आणि माझा स्नेह कसा जुळला असता ? बाबा, तुमचें सिंहासन सर्वांत श्रेष्ठ समजलें जावें, ह्याची चिंता मी रात्रंदिवस वाहतों; आणि हा माझा स्वधर्म असून ह्यांत कांहीं वावगें नाहीं. ह्या स्वधर्माला धरून मी राजसभेंत द्रौपदीला कळवितों, द्यूताच्या नियमाप्रमाणें सर्व जिंकलेल्या वस्तु पुन्हां जशाच्या तशा परत करून त्यांतल्या पाहिजे तेव्हढ्याच वस्तु पुन्हां पणाला लावून प्रतिपक्षास द्यूत पुन्हां खेळावयास लावण्याचा हक्क जिंकणाराला आहे. पांडवांचें जें जें मीं जिंकलें आहे तें तें मी सर्वच्या सर्व परत करायला तयार आहें.

**शकु०:**—म्हणजे सुयोधना, हें तूं काय आरंभलें आहेस ?

धृत०:—बाळ, तूं कुरुनंदन शोभतोस खरा.

दुर्यो०:—तें सर्व परत केल्यावर, धर्मानें एकच डांव द्यूत खेळावें. पांडवांनीं जर जिंकलें, तर त्यांच्या साम्राज्यलक्ष्मीबद्दल आजन्म मी एक ब्रहि तोंडांतून काढणार नाहीं. पांडव जर हरले, तर त्यांनीं आपलीं नुसतीं शस्त्रास्त्रें घेऊन बारा वर्षें रानावनांत काढून बालकृष्णचरित्राचा कित्ता म्हातारपणीं खुशाल गिरवावा; आणि तेरावें वर्ष अज्ञातवासांत काढून झाल्यावर, तोंपर्यंत माझ्याजवळ ठेव म्हणून ठेवलेल्या साम्राज्य-लक्ष्मीचा उपभोग खुशाल घ्यावा.—दिग्विजय करणारा वीर नुसता कर-भार घेऊन मांडलीक बनवून ज्याप्रमाणें पराभूत केलेल्यांना सोडीत असतो, त्याप्रमाणें असल्या द्यूताचा करभार घेऊन मी पांडवांना सोडून द्यायला तयार आहें.—पण द्रौपदी, हें करभाराचें दुसरें द्यूत सुरू होण्यापूर्वीं, पहिल्या ह्या द्यूतांत तुम्ही पुरते दुर्दैवी ठरलां हें जगाला जाहीर होण्याक-रितां, तूं दासी झालीस, हें नुसतें शब्दानें तरी कबूल केलें पाहिजेस.

कर्ण:—शाबास सुयोधना, शाबास. सुयोधना, तूं ह्या दाल्या कर्णाचा दुसरा प्राण आहेस खरा.

दुर्यो०:—बाबा, आपण हे कर्णाचे उद्गार ऐकलेच आहेत; आपल्या मुलाच्या हातून वेडेंवांकडें कांहीं होईल, ही भीति बिलकूल बाळगूं नका. द्रौपदी, हा उदार सुयोधन तुझ्या गुरूच्या चरित्राची शिकवणूक जशीच्या तशी गिरवण्याची संधि तुला देतो आहे. तूं मात्र ह्या राजसभेंत, मी दासी झालें, हे शब्द उच्चारले पाहिजेस. एव्हढे शब्दहि उच्चारण्याला जर तूं तयार झाली नाहींस, तर पांडवांना आजन्म दास्यांत खितपत पडावें लागेल; आणि तुझी इच्छा असो वा नसो, बलात्कारानें दासी म्हणून जन्मभर तुला पाहिजे तशी राबविण्याला आम्ही कौरव कमी कर-णार नाहीं.

पद ४४. [ राग—सोहनी; ताल—सुरफाक्ता. चाल—‘ प्रथम आद ’ ]

जरि न आतां घांसशिल नाका; तुज कौरव
शंभर बांधव करीतिल बटिका ॥ ध्रु० ॥

कृष्ण–सख्यासि मारशील हाका; ऐसा धांवा
ठरेल परि लटिका ॥ १ ॥

बोल, द्रौपदी, नुसत्या शब्दांतलें तरी दास्य एका क्षणापुरतें कबूल कर-ण्याला तूं तयार आहेस का ?

**द्रौप०:**—मी दासी नाहीं, स्वतंत्र आहें.—मीं जर दास्य कबूल केलें तर माझी पुण्याई, हंबरडा फोडून आईला बोलावल्याप्रमाणें विश्वांतल्या पुण्याईला माझ्या मदतीला कशी आणील ? सर्व अणुरेणूंत भरलेल्या विश्वाच्या स्वतंत्र पुण्याईला दासांकडे पाहून पान्हा फुटत नाहीं; स्वतःचें तान्हुलें हें नव्हे, असें त्या विराटस्वरूपी स्वतंत्र शक्तीला वाटतें ! त्या स्वतंत्र विराटशक्तीचें तान्हुलें झालें तरी स्वतंत्रच असावें लागतें !—मातेला पान्हा न फुटेल असलें तान्हुलें ह्या नव्या कृष्णजन्माचे वेळीं ह्या सभेच्या दृष्टीला कसें पडेल ?—मी दासी नाहीं, स्वतंत्र आहें; आणि स्वतंत्रपणानेंच ह्यांना दास्यांतून सोडविण्याची किंमत विचारीत आहें.

**दुर्यो०:**—तूं प्रथम दासी झाली पाहिजेस, आणि नंतर किंमतीची वाटाघाट.—कबूल कर द्रौपदी, नुसत्या शब्दानें दास्य कबूल कर—

**द्रौप०:**—नाहीं, मी दासी नाहीं—

**दुर्यो०:**—नाहीं कबूल करीत ?—नुसत्या शब्दानें कबूल कर.

**द्रौप०:**—नाहीं, नाहीं, त्रिवार नाहीं.

**दुर्यो०:**—दुःशासना, ओढ तिला जबरदस्तीनें ओढ, आणि विचार दासी म्हणून कौरवांपैकीं कोणाच्या मांडीवर बसण्याची इच्छा आहे.—ह्या सुयोधनाच्या मांडीवर—

**भीमः**—ती मांडी हा भीम रणांगणावर गदेनें चूर्ण करील—

**द्रौप०:**—शांत व्हा, शांत व्हा, आपण दास आहां.

**दुःशा०:**—कोण तूं भीम ? जन्मभर आतां पाटावरवंटा तुझ्या हातचा सुटेल तेव्हां ना ?—बोल द्रौपदी, कोणाच्या मांडीवर तुला नेऊन बसवूं तें बोल.—पांडवांच्या देखत तुझें हें दुसरें स्वयंवर जबरदस्तीनें साजरें करा-

यला हा दुःशासन सज्ज झाला आहे.—बोल, तुला कोण आवडतो बोल.

**भीमः**—हरएक प्रकारचे नियम झुगारून देऊन, विश्वांतील सर्व संसारांचा चेंदामेंदा करून, ह्या पृथ्वीची पुन्हां शाडूची माती बनवावी, असें मला वाटतें.—मी कोणताच नियम पाळित नाहीं; आणि कोणालाहि पाळूं देणार नाहीं.—सर्व संसारांची उलथापालथ करून क्रूराहूनहि क्रूर होऊन, ह्या वेळीं ह्या दुःशासनाच्या नरडीचा घोट घ्यावा असें मला वाटतें !

**द्रौप०:**—शांत व्हायचें होतें.—विश्वाच्या रचनेस धक्का न लावतां, ह्या चांडाळाच्या नरडीचा घोट घेण्याची वेळ पुढें खात्रीनें येईल.

**दुःशा०:**—ह्या वल्गनांना कोणीहि येथें भीक घालणार नाहीं. बोल द्रौपदी, कोणाच्या मांडीवर मी तुला नेऊन बसवूं तें बोल.

**द्रौप०:**—द्रोणगुरूंना, विदुरमामंजींना, पितामह भीष्मांना हे शब्द ऐकवतात काय ?—सांगा, वृद्धांनों, सांगा; मी दासी आहें काय? स्वतंत्र असलेल्या द्रौपदीला उद्देशून उच्चारलेले हे घाणेरडे शब्द वृद्धांनों, तुम्हाला खपतात काय ?

**भीष्मः**—द्रौपदी, स्वतः दास झाल्यावर धर्मानें तुला पणाला लावली हें खरें आहे; तेव्हां एकापक्षीं तुला पणाला लावण्याचा अधिकारच धर्माला उरला नव्हता, असें म्हणावें लागतें. पण सूक्ष्म धर्म जाणणाऱ्या धर्मराजानें स्वतः तुला पणाला लाविली, हें करणें निरर्थक होतें, असें सूक्ष्म धर्म न जाणणाऱ्या आणि केवळ वीरवृत्तीलाच वाहिलेल्या आम्हीं वृद्धांनीं कसें म्हणावें ?

**दुःशा०:**—द्रौपदी, हे वृद्ध आमच्या बाजूचे नसले तरी तुझ्याहि बाजूचे नाहींत.—आतां तूं आहेस आणि मी आहें.—सांग, कोणाची मांडी पसंत करतेस तें सांग.

**भीमः**— मी सांगतों—

**द्रौप०:**—शांत बसायचें होतें. आलेलीं दुःखें निमटपणें सोसणें, हाहि परा-

क्रमच आहे.—कौरवेश्वरा, आपण श्रीकृष्णाची स्तुति माझ्या देखत परवां एकदां केली आहे; आपल्या त्या कृष्णभक्तीला ह्या वेळीं जागी करा, श्रीकृष्णाला आपण केलेलें नमन आठवा, आणि भक्तांचा नाहक छळ करणाऱ्यांचीं पाळेंमुळें—

दुर्यो०:—द्रौपदी, तुझ्या त्या कृष्णाचा महिमा आणि तुझी कृष्णभक्ति ऐकतां ऐकतां माझे कान किटले आहेत.—माझीं पाळेंमुळें खणायला कोणता कृष्ण धांवत येणार, त्याला खुशाल बोलाव; त्याच्या तोंडावर मी सिद्ध करून देतों, त्याच्या इतका भामट्या दुसरा कोणीहि नाहीं.

द्रौप०:—नका, कृष्णनिंदेनें जीभ विटाळूं नका.—मी श्रीकृष्णाचा धांवा करतेंच; त्यांना योग्य वाटलें तर माझी अब्रू सांभाळतील; तसें त्यांना योग्य वाटलें नाहीं तर, आलेलें दुःख मी निमुटपणें जिवांत जीव राहि-ल्यास सोसावें, अशीच त्या सर्वज्ञानी—सर्वशक्तिमान्—परमकनवाळू श्रीकृष्णाची ह्या वेळीं आज्ञा आहे, असें मी समजेन.—श्रीकृष्ण सर्वज्ञानी आहेत; त्यांच्या त्या ज्ञानाला ह्या वेळीं प्रगट होणें जर योग्य वाटलें नाहीं, तर मजसारख्या अल्पज्ञानी भक्ताचा धांवा लटका ठरला म्हणून काय झालें ? श्रीकृष्ण सर्व-शक्तिमान् आहेत; त्यांच्या त्या शक्तीला दुःशासना, तुझा हात ह्या स्थळीं धरावासा जर वाटलें नाहीं, तर तेव्हढ्यानें ते अब-लांचे कैवारी नाहींत असें कसें होईल ? श्रीकृष्ण परमकनवाळू आहेत; त्या दयासागराला ह्या माझ्या देहावर दयेचें सिंचन न करतां माझा बळी घेऊन पांडवांचें कोटकल्याण करावें असें जर वाटलें, तर त्यांच्या कनवा-ळुपणाला ओहटी लागली असें कोणचा भक्त म्हणेल ?—श्रीकृष्ण माझ्या मदतीला ह्या वेळीं धांवत येतील, अशा पूर्ण भक्तिभावानें मी आतां त्यांचा धांवा करितें; पण भावोजी, माझें एव्हढें ऐकाच; श्रीकृष्णाचे गुण ह्या वेळीं क्षणभर तरी आठवा—

दुर्यो०:—सर्व बाजूंनीं मांजरी कोंडली म्हणजे जशी नखें काढते, तसें हिनें निर्वाणीचें शस्त्र म्हणून कृष्णाचें नांव पुढें केलें आहे. द्रौपदी, तुझा

क्रमच आहे.—कौरवेश्वरा, आपण श्रीकृष्णाची स्तुति माझ्या देखत परवां एकदां केली आहे; आपल्या त्या कृष्णभक्तीला ह्या वेळीं जागी करा, श्रीकृष्णाला आपण केलेलें नमन आठवा, आणि भक्तांचा नाहक छळ करणाऱ्यांचीं पाळेंमुळें—

दुर्यो०:—द्रौपदी, तुझ्या त्या कृष्णाचा महिमा आणि तुझी कृष्णभक्ति ऐकतां ऐकतां माझे कान किटले आहेत.—माझीं पाळेंमुळें खणायला कोणता कृष्ण धांवत येणार, त्याला खुशाल बोलाव; त्याच्या तोंडावर मी सिद्ध करून देतों, त्याच्या इतका भामट्या दुसरा कोणीहि नाहीं.

द्रौप०:—नका, कृष्णनिंदेनें जीभ विटाळूं नका.—मी श्रीकृष्णाचा धांवा करतेंच; त्यांना योग्य वाटलें तर माझी अब्रू सांभाळतील; तसें त्यांना योग्य वाटलें नाहीं तर, आलेलें दुःख मी निमुटपणें जिवंत जीव राहिल्यास सोसावें, अशीच त्या सर्वज्ञानी—सर्वशक्तिमान्—परमकनवाळू श्रीकृष्णाची ह्या वेळीं आज्ञा आहे, असें मी समजेन.—श्रीकृष्ण सर्वज्ञानी आहेत; त्यांच्या त्या ज्ञानाला ह्या वेळीं प्रगट होणें जर योग्य वाटलें नाहीं, तर मजसारख्या अल्पज्ञानी भक्ताचा धांवा लटका ठरला म्हणून काय झालें ? श्रीकृष्ण सर्व-शक्तिमान् आहेत; त्यांच्या त्या शक्तीला दुःशासना, तुझा हात ह्या स्थळीं धरावासा जर वाटलें नाहीं, तर तेव्हढ्यानें ते अबलांचे कैवारी नाहींत असें कसें होईल ? श्रीकृष्ण परमकनवाळू आहेत; त्या दयासागराला ह्या माझ्या देहावर दयेचें सिंचन न करतां माझा बळी घेऊन पांडवांचें कोटकल्याण करावें असें जर वाटलें, तर त्यांच्या कनवाळुपणाला ओहटी लागली असें कोणचा भक्त म्हणेल ?—श्रीकृष्ण माझ्या मदतीला ह्या वेळीं धांवत येतील, अशा पूर्ण भक्तिभावानें मी आतां त्यांचा धांवा करितें; पण भावोजी, माझें एव्हढें ऐकाच; श्रीकृष्णाचे गुण ह्या वेळीं क्षणभर तरी आठवा—

दुर्यो०:—सर्व बाजूंनीं मांजरी कोंडली म्हणजे जशी नखें काढते, तसें हिनें निर्वाणीचें शस्त्र म्हणून कृष्णाचें नांव पुढें केलें आहे. द्रौपदी, तुझा

पदर ओढून तुला नागडी करून कृष्णाच्या नांवाचा बुडबुडा एका फुंकरानें दुःशासन फोडल्यावांचून राहणार नाहीं. दुःशासना, हिचा धांवा संपतांच हिचा पदर बेलाशक ओढ आणि हिला नागडी कर.—कर, द्रौपदी तुझ्या देवाचा धांवा कर.

द्रौप०:—श्रीकृष्णा, तुझ्याशिवाय कोण माझी अब्रू राखणार ?

पद ४५. [ राग–भैरवी; ताल–दीपचंदी. चाल–' भाईवे तोरी ' ]

मी जरि आज माधवा, गमविली लाज,
भक्तसमाज केशवा, विसरील काज ॥ध्रु०॥
भक्त जगतिं तुझा नाश न पावे कधीं देवा;
वस्त्र बनुनि नवें शाश्वत केलें मम
भावा ॥ १ ॥

[ पदाचा पूर्वार्ध झाल्यावर ' पदर ओढ ' म्हणून दुर्योधन म्हणतो; दुःशासन पदर ओढतो; श्रीकृष्णाची बालमूर्ति सिंहासनामागें प्रगट होते; आणि दुःशासनाच्या हातांत वस्त्र आलें तरी द्रौपदीचें वस्त्र नाहींसें होत नाहीं; दुःशासन हातीं आलेलें वस्त्र घेऊन खजील होऊन दुर्योधनाजवळ जातो; नंतर पदाचा उत्तरार्ध होतो. ]

विदु०:—अंधा धृतराष्ट्रा, हा द्रौपदी–वस्त्रहरणाचा चमत्कार ऐक.—तुझ्या नीच पुत्रानें द्रौपदीचें वस्त्र ओढलें, पण श्रीकृष्णानें दुसरें वस्त्र द्रौपदीला नेसविलें !

दुर्यो०:—कसला चमत्कार घेऊन बसला आहां ! कपटी कृष्णाप्रमाणेंच ही द्रौपदीहि डोंबारीण आहे. असल्या चेटक्यांना कोण विचारतो ?—द्रौपदी, पुन्हा धांवा कर, तुझें चेटूक चव्हाट्यावर आणतों; कर धांवा, धांवा कर.

द्रौप०:—श्रीकृष्णा, तुझ्या लीलेचीहि परीक्षा हे घेत आहेत.

[ पूर्वीप्रमाणेंच पद व चमत्कार; भानुमती येते. ]

भानु०:—मामंजी, नका, नका, ह्या साध्वीचा असा छळ होऊं देऊं

नका.—सर्व राजवाडा अपशकुनांनीं दणादणून गेला आहे ! प्रळयकाळा-सारखे भेसूर आवाज ऐकूं येऊं लागले आहेत ! आणि सासुबाईनीं हा छळ बंद पाडण्याकरितां मला राजसभेंत पाठविलें आहे.

दुर्यो०:—भोळसट कोठली ! उगीच आपण गांगरून जाते, आणि दुसऱ्यांना भिवविते. बायका आणि म्हातारे ह्यांचीं अंगं उगीचच्या उगीच लटलट कांपूं लागतात.—दुःशासना, ह्या द्रौपदीच्या गारोडी विद्येचा अंत मला पहायचाच आहे. द्रौपदी, कर पाहूं पुन्हां धांवा; ह्या खेपेस तुझी गारुडी विद्या तुला उपयोगी पडायची नाहीं. कर पाहूं पुन्हां धांवा.

द्रौप०:—देवा, तुझ्या हातांना कितीदां श्रम देऊं ?

[ पूर्वीप्रमाणेंच पद व चमत्कार.

भानु०:—ही श्रीकृष्णाची बालमूर्ति पहा, ही पहा मामंजी, ही बाल-मूर्ति पहा.—हा छळ थांबवा मामंजी, हा छळ थांबवा—

धृत०:—[ सिंहासनावरून उठून खालीं उभा राहून. ] दुःशासना, दुर्योधना, पुरे झाला हा छळ.—द्रौपदी दासी नाहीं, स्वतंत्र आहे, असा ह्या सिंहासनाचा निर्णय मी देतों आहें.—मुली, तूं दासी नाहींस, स्वतंत्र आहेस.—मुली, तुझ्या पुण्याईमुळें परमेश्वराची बालमूर्ति माझ्या राजसभेंत प्रगट झाली हे तुझे माझ्यावर मोठे उपकार झाले आहेत.—ह्या उपकारांची फेड म्हणून मुली, तूं ह्या तुझ्या सासऱ्यापासून वर मागून घ्यावेस अशी माझी इच्छा आहे.

द्रौप०:—महाराज, पांडव दास नसावेत हा वर मी मागतें आहें.

धृत०:—पांडव ह्यापुढें दास नाहींत.—मुली, दुसरा वर माग; तो देण्याला मी उत्सुक आहे.

द्रौप०:—पांडवांचीं शस्त्रें पांडवांना परत मिळावींत.

धृत०:—शस्त्रास्त्रें परत दिलीं आहेत. मुली, सर्व वैभव मागून घे; तिसरा वर देण्याला मी उत्सुक आहें.

द्रौप०:—महाराज, क्षत्रियांनीं वैभव मागायचें नसतें; पराक्रमानें



**भानु०**—हीं श्रीकृष्णाची बालमूर्ति पहा. [ पृ. ७२. ]

...यचें असतें. सशस्त्र पांडव पाहिजे तें वैभव पराक्रमानें मिळवूं शक-

...त०:—नाहीं, मुली, तिसरा वर माग; एरव्हीं माझें समाधान व्हायचें न.

...प०:—महाराज, पांडवांना सशस्त्र आणि स्वतंत्र करण्याची माझी काळजी आपण एका क्षणांत दूर केलीत. सशस्त्र आणि स्वतंत्र झालेल्या पांडवांनीं तेरा वर्षें तरी कौरवांच्या राजलक्ष्मीला त्रास देऊं नये, अशी कौरवेश्वरानें आपली इच्छा नुकतीच बोलून दाखविली आहे; तेव्हां त्या इच्छेला अनुसरून पण ठरवून हें द्यूत आतां संपवावें, अशी माझी तिसरी विनंति आहे.

धृत०:—समजलों, मुली, समजलों; माझ्या दोन वरांची फेड तूं ह्याच वेळीं ह्याच स्थळीं करूं इच्छिते आहेस.

द्रौप०:—होय महाराज. आज फांसा शकुनीच्या हुकुमतींत आहे; अशा वेळीं आपल्या सर्व औदार्याचा ओघ आम्हीं आमच्याकडे ओढून घ्यावा, आणि आपल्या पुत्रांकडे आपणाला पाहूं देऊं नये, हा अधर्म होईल.

धृत०:—तुझी इच्छा, तीच श्रीकृष्णाची इच्छा. धर्मा, फांसा तुझ्या सारखा पडला तर साम्राज्यलक्ष्मी तुझी, नाहीं तर बारा वर्षें वनवास आणि एक वर्ष आज्ञातवास द्रौपदीसह तुम्हीं पांडवांनीं भोगून मग राज्य-लक्ष्मीवर हक्क सांगावा.—शकुनी, फांसा टाक.

शकु०:—जिंकलें, जिंकलें! पांडवांच्या आणि द्रौपदीच्या कपाळीं वनवास आला.

द्रौप०:—मामंजी, वनवासाला निघालेल्या ह्या पांडवांना आणि आपल्या ह्या सुनेला ह्या वेळीं आशीर्वाद मिळावा. [ नमस्कार करतात.

धृत०:—मुली, सर्व कल्याणांचा मूर्तिमंत ठेवा तूं आहेस. आजच्या-

प्रमाणें सर्व प्रसंगीं आणि सर्व काळीं, परमेश्वर तुझा पाठिराखा राहील असा माझा आशीर्वाद आहे.

पद ४६. [ राग—भैरव; ताल—ब्रह्मताल. चाल—'मोरई आये' ]

श्री तव होवो, विजयहि पावो धर्म कुशल
शुभ—फल ॥ ध्रु० ॥ योगी कृष्ण सखा
कारिशिल जवळ; भक्तिभाव तुज बल ॥ १ ।

पडदा

समाप्त.

